# पंथराज






शक्तिपातयोगासंबंधी एकमेव मराठी त्रैमासिक

वर्ष २ रे
अंक १ला
शके १८९४

# परमपूजनीय श्रीगोळवलकर गुरुजी यांचा
## पंथराजास शुभाशीर्वाद
### राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, नागपूर



पत्र क्र. १८७ दिनांक ३–१२–७१ तिथि-मार्गशीर्ष वद्य १ शके १८९३

श्रध्देय श्री केशवराव जोशी यांसी–प्रेमपूर्वक सा. न. वि. वि.

आपल्या दि. ९–११ च्या पत्राची पोंच आपणास मिळालीच असेल. मी काल सकाळी नागपूरला आलो. नंतर पत्र पाहिले. "पंथराज" त्रैमासिकाचे तीन अंकहि पाहिले. त्यांतील प्रथम अंक बराचसा वाचून झाला. सध्या नागपुरच्या संघशाखेचे हिवाळी शिबिर चालू असल्याने सवड कमी मिळते व माझ्या अनुपस्थितींत आलेल्या मुख्य मुख्य पत्रांना उत्तरे लिहिण्यांतहि बराचसा वेळ जातो म्हणून अधिक वाचूं शकलो नाहीं. सावकाश वाचेन.

जें वाचलें तें अत्यंत उद्‌बोधक व मनाला सन्मार्ग दाखविणारे, विश्वास वाढविणारें असेंच वाटले. अध्यात्म योग, शक्तिपात आदि शब्दांनी गांगरलेल्यांना समजावून धीर देणे व खरा जीवनहेतु स्पष्ट करून तो साध्य करण्यात सुगमता समर्थ सद्‌गुरु कृपेमुळें प्राप्त होते हे सत्य बिंबवून देणे या त्रैमासिकांतील लिखाणांतून होईल अशी खात्री वाटते.

आपला देश विशाल आहे. पृथ्वीवर अनेक लहान मोठे देश आहेत. सर्वत्र या मार्गाचे जिज्ञासु आहेत. त्यांचे हिताकरिता सद्‌गुरु म्हणून ज्यांच्या सेवेंत उपस्थित झाल्यास खरे कल्याण होईल अशा अधिकारी महात्म्यांची माहिती असणे उपयुक्त ठरेल असे वाटते.

सध्या आपल्या परिसरांत परमश्रध्देय श्रीमत् योगिराज श्री गुळवणी महाराज अ[illegible] आमचे भाग्य आहे. त्यांचा वरदहस्त आमचेवर आहे हा पूर्ण विश्वास आहे. त्यांच्या आशीर्वादाने हे त्रैमासिक त्रिविधतापे पोळलेल्यांना खरी शांति देण्यास समर्थ होईल. त[illegible] म्हणून सर्व समर्थ श्री प्रभुचरणीं प्रार्थना करतो.

श्री सद्‌गुरु श्रीमत् गुळवणीमहारा[illegible]चरणीं अनंत प्रणाम ! इति शम् ।

आपला स्नेहाकांक्षी

मा. स. गोळवल[illegible]

॥ श्री गुरुःशरणम् ॥

# ★ पंथराज ★

( शक्तिपातयोगासंबंधी एकमेव मराठी त्रैमासिक )

संस्थापक–योगीराज, सद्‌गुरु, श्रीसंत वामनरावजी गुळवणी महाराज

संचालक–राष्ट्रीयपंडित श्रीदत्तात्रेयशास्त्री धुंडिराजशास्त्री कवीश्वर

संपादक–केशव रामचंद्र जोशी, एम्. ए.

सहसंपादक–सुधाकर सिताराम अत्रे, बी. ए.

कार्यकारी संपादक–अच्युत सिद्धनाथ पोटभरे, एम्. ए.

व्यवस्थापक–गोविंद आत्माराम गोखलें

तें कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।
जया विश्वबीजाचिया कोंभा । साऊली केली ॥

" योगेश्वर ज्ञानदेव "

वार्षिक वर्गणी ५ रु. किरकोळ अंक १–५० रु.

वर्ष २ रे ] [ अंक १ ला

इ. स. १९७२ ) चैत्रशुद्ध प्रतिपदा ( शके १८९४

*सद्‌गुरु महिमा–*

संतांचा महिमा कोण जाणे सीमा । सीणला हा ब्रह्मा बोलवेना ॥ १ ॥
संतांची हे कला पाहतां न कळे । खेळोनिया खेळ वेगळाची ॥ २ ॥
संतांचिया पारा नेणें अवतारा । म्हणती याच्या पारा कोण जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे धन्य धन्य भेट झाली । कल्पना निमाली संतांपायीं ॥ ४ ॥

– श्री संत नामदेवमहाराज –

पत्रव्यवहाराचा व वर्गणी पाठविण्याचा पत्ता–

श्री गोविंद आत्माराम गोखले

श्री वासुदेव निवास, एरंडवन, कर्वेपथ, पुणे ४

# कुंडलिनी दर्शन शेष म्हणजेच कुंडलिनी शक्ती

सर्व शक्तिमान अशा परमेश्वराच्या शक्तीचे मोजमाप होऊ शकत नाही. शक्ती ही अनंत असून ती अनेक ब्रह्मांडांची रचना करते. प्रत्येक ब्रह्मांडामध्ये हरि, हर व ब्रह्मदेव हे निरनिराळे असतात. प्रत्येक ब्रह्मदेव ब्रह्मांड निर्माण करण्याकरिता खूप शक्ती खर्च करतो असे दिसते. परंतु ब्रह्मांड निर्मितीच्या कामासाठी वापरलेली शक्ती ही मूळ अनंत शक्तीच्या स्वल्पमात्र भागाचीही बरोबरी करू शकत नाही. ही उपयोगात आलेली शक्ती एकदोन कणाइतकीच असते. याचे कारण असे आहे की अनंत वस्तू कधीही सांत म्हणजे मर्यादित होऊ शकत नाही. ही गोष्ट सहज लक्षात येण्यासारखी आहे. एका वटवृक्षच्या बी मध्ये अत्यंत विशाल असा वटवृक्ष सामावलेला असतो. इतकेच नव्हे तर त्याच्या प्रत्येक बी मध्ये आपल्यासारख्या असंख्य बिया उत्पन्न करण्याची शक्ती असते. याचा अर्थच असा आहे की प्रत्येक बी मध्ये अनंत शक्ती भरलेली असते. अणुबाँबचा चमत्कार सर्वांना माहीत झाला आहे. एका एका अणुमुळे किती प्रचंड गोष्टी घडून येतात हे काही सांगता येत नाही. परमात्म्याची अनंत शक्ती अनंत रुपानेच परिपूर्ण भरलेली असते. अनंताच्या भांडारातून प्रवाहित झालेली शक्ती सक्रीय होऊन कार्य करते. मात्र ही शक्ती कार्य करून संपुष्टात आली तर तिला अनंत कोण म्हणेल ? ब्रह्मांडाची रचना केल्यावर जी अनंत शक्ती शिल्लक राहाते ती अणुस्वरूप धारण करण्यासाठी चक्राकार गतीने फिरू लागते. शक्तीच्या या कुंडलाकृती फिरण्याच्या स्वरुपामुळे तिला सर्पाची उपमा दिली जाते. या सर्पाकार रूप धारण करणाऱ्या शक्तीलाच अथर्ववेदामध्ये उच्छिष्ट ब्रह्म असे म्हटले आहे. भगवान् विष्णू या शक्तीचीच शय्याकरून त्यावर पहुडला आहे असे वर्णन पुराणामध्ये केलेले आहे. या शक्तीलाच शेष म्हणजे शिल्लक राहिलेली शक्ती असे म्हटले जाते. या शेष किंवा उच्छिष्ट शक्तीचाच ब्रह्मांड धारणेसाठी उपयोग होतो. या शेष शक्तीने आपल्या हजारो फण्यांवर ब्रह्मांड धारण केले आहे असे मनोहरवर्णन पुराणात केलेले आढळते. शेष शक्ती विश्व धारण करते. या करिता संरक्षक व आधार शक्ती या नात्याने ती भगवान् विष्णूनारायणाचे साक्षात् रूप आहे असे म्हटले जाते. पृथ्वीवरील पर्वत, वन इत्यादि सर्वांना ज्याप्रमाणे वरील शेषनागाचाच आधार असतो त्याप्रमाणे सर्व योगतंत्रादींना ही कुंडलिनी शक्तीच आधार असते. पिंड शरिराची रचना केल्यावर जी शक्ती शिल्लक राहाते ती मूलाधारामध्ये शरीर धारण करून स्वस्थ निद्रा घेत पडून राहाते. या करिताच तिला आधारशक्ती असे म्हटले जाते. या आधार शक्तीचेच नाव कुंडलिनी आहे. ही शक्ती जेव्हा गुरुकृपेने जागृत होते त्यावेळी प्रतिप्रसव क्रमाला म्हणजेच संहारणीला सुरवात होते. ही सुरवात झाली की कुंडलिनी शक्ती सर्व तत्त्वांचा क्रमशः लय करीत सुषुम्नामार्गाने सहस्राराकडे जाऊ लागते. ह्या संहारणीच्या वेळी ही शक्ती जणू काही सर्व तत्त्वांचे भस्म करून शिवाच्या अंगाला [illegible] विभूतीच लावते. हा लयक्रम म्हणजे मोक्षाचा मार्ग होय.

—प. प. विष्णुतीर्थस्वामी महाराज—

# डोळियाचा डोळा उघडला !

लेखक—संतचरणरजसेवक

**प्रस्तावना :–**

भक्तिश्रेष्ठशिरोमणी श्रीसंत नामदेवमहाराज हे संत मालिकेतील एक अत्यंत थोर संत म्हणून प्रसिद्ध आहेत. अगदी लहानपणापासून ते देवाची भक्ती करीत असत. या भक्तीच्या जोरावर त्यांनी देवाशी मित्रत्वाचे नाते जोडले होते. असे जरी असले तरी नारदांनी भक्तिसूत्रात कथन केलेली दिव्यभक्ती त्यांचे ठिकाणी प्रथम उत्पन्न झालेली नव्हती. **'सा तस्मिन् परमप्रेमरूपा' 'अमृतस्वरूपा च' 'यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति', 'यत्प्राप्य न किंचिद्वाञ्छति, न शोचति' 'न द्वेष्टि, न रमते नोत्साही भवती' 'यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति'.** असे दिव्य भक्तीचे स्वरूप श्रीनारदांनी सांगितले आहे. ती भक्ती अंतरात्म्याचे ठिकाणी भगवंताबद्दलच्या परमप्रेमाच्या रूपाने साकार होते. निर्हेतुक व निरतिशय प्रेम अशा भक्तीत अंतर्भूत असते. या भक्तीत निष्काम व निरंतर अशा प्रेमाचा प्रवाहच अंतःकरणात उत्पन्न होतो.

ही भक्ती अमृतासारखी आहे. मोक्ष हेच तिचे स्वरूप आहे. अशी ही भक्ती ज्याला प्राप्त होते तो मानव पूर्णतेला पोहोचतो. अमर होतो. सर्वार्थाने तृप्त होतो. अशी ही अमृतासारखी भक्ती प्राप्त झाल्यावर भक्त कशाचीही किंचित्सुद्धा इच्छा करीत नाही. तो कोणाचा द्वेष करीत नाही. कोणत्याही गोष्टीत रममाण होणे त्याला आवडत नाही. त्याला कोणत्याही कर्माचा उत्साह नसतो. ज्याला अशी अमृतासारखी दिव्य भक्ती मिळते व जो त्याचा अनुभव घेतो तो अगदी वेडा होऊन जातो. तो त्या भक्तिप्रेमाने धुंद व मस्त होतो, शांत होतो व आत्मस्वरूपात रममाण होऊन अगदी आत्मस्वरूप होतो.

अशी ही मोक्ष देणारी अमृतासारखी दिव्य भक्ती श्रीनामदेवांना त्यांचे परमश्रेष्ठ सद्गुरू श्रीसंत विसोबा खेचर यांनी शक्तिपातपूर्वक कृपा केल्यावर प्राप्त झाली. त्याचे वर्णन करताना श्रीनामदेव म्हणतात.

सद्‌गुरूसारिखा सोइरा जिवलग। तोडीला उद्वेग संसारीचा ॥ १ काय उतराई होऊं कवण्या गुणें। जन्मा नाहीं येणे ऐसे केले ॥ २ ॥ माझे सुख मज दाखविले डोळा। दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥ ३ ॥ डोळियाचा डोळा उघडिला जेणे। लेवविले लेणे आनंदाचे ॥ ४ ॥ नामा म्हणे निकी सापडली सोय। न विसंवे पाय खेचराचे ॥ ५ ॥ श्रीनामदेवांवर एखाद्या जिवलग मित्राप्रमाणे श्रीसंत विसोबा खेचरांनी कृपा करून त्यांना अखंड आनंदाची अपूर्व स्थिती प्राप्त करून दिली.

संसारचे दु:ख व उद्वेग तोडून टाकला. यामुळे त्यांचे कसे उतराई व्हावे हेच नामदेवांना कळेना. सद्‌गुरूरायांनी जन्ममरणाचा फेरा चुकवून त्यांना सुख प्रत्यक्ष दाखविले. प्रेमाची दिव्य ज्योत त्यांच्या अंत:करणात पेटविली. नामस्मरणाकरिता नाममंत्रही दिला. दिव्य दृष्टीचे उन्मीलन घडवून आणले. अशा तऱ्हेने नामदेव कृतार्थ झाले.

श्रीसंत नामदेवांनी वर्णन केलेल्या या अनुभवाचा विचार केला असता पुढील प्रश्न उपस्थित होतात. गुरूपदेश होण्यापूर्वी नामदेवांची स्थिती कोणती होती ? श्रीसंत विसोबा खेचर यांनी नामदेवार कृपा केली म्हणजे काय केले ? या कृपेमुळे नामदेवांना कोणते अनुभव आले ? या प्रश्नांचा विचार करणे हा या लेखाचा हेतू आहे.

**सद्‌गुरू कृपा होण्यापूर्वीची स्थिती :–** सद्‌गुरूची कृपा होण्यापूर्वी नामदेवांची स्थिती कशी होती हे पाहाणे इष्ट ठरणार आहे. त्यामुळे सद्‌गुरु कृपा झाल्यावर त्यांच्यामध्ये जो पालट घडून आला त्याचे माहात्म्य ध्यानात येईल. त्याच बरोबर सद्‌गुरु कृपेचे अपरिहार्यत्व व सामर्थ्य यांची जाणीव होईल.

**पांडुरंगाशी सख्य :–** नामदेवांचे पांडुरंगाशी फार मोठे सख्य होते. दोघांनाही एकमेकावाचून चैन पडत नसे. त्या दोघांचे नाते अगदी जिवाभावाच्या मित्रासारखे होते. एकदा दोघांमध्ये प्रेमाचा कलह झाला. नामदेवांची बायको राजाई हिने पांडुरंगापाशी तक्रार केली की, " घरामध्ये धान्याचा एक कणही खाण्याकरिता नाही. ल्हानं मुले उपाशीतापाशी आहेत. अशा वेळी नामदेव भजन करीत बसतात. या अव्यवहारी कृतीला तुम्ही जबाबदार आहात ! "

त्यावेळी पांडुरंग नामदेवाना म्हणाले की, अरे नामदेवा ! तू राजाईचा अंगीकार कर व दैवाचा सुखी हो. "

पांडुरंगाच्या या उपदेशाचा नामदेवांना अत्यंत राग आला. त्यामुळे ते पांडुरंगाला म्हणाले.

राहे नामी आता जाईन दूर देशा । भक्तीची हे आशा सोडोनिया ।। जाईल भीवरा जाईल पुंडलिक । जाईल सकळीक महिमा तुझी ।। ऐसें वा विठ्ठला त्वां दुखविले मज । सोडीना सहज पंढरीते ।। उदास हें चित्त माझे झाले देवा । जाईन केशवा मायबापा ।। आता असो द्यावा लोभ हाचि देवा । समर्था केशवा मायबापा ।। आपुल्या सांगाते नेईन पंढरी । नेईन संतनगरी भिवराजना ।। नेईन सांगाते महिमा येथींची । मागे हेत हाचि धरूनि राहे ।। इतके बोलून नामदेव रागारागाने पंढरपूर सोडून निघून जाऊ लागले.

बोलोनिया ऐसे पुढे चाले नामा । मग आला प्रेमा पांडुरंगा ।। पळता पळता नाटोपे जाणा । मागे देवराणा धावत्से ।। धावता धावता भागला केशव । उभा राहे तंव हात कटीं ।। जे कां पंढरपूर वस्तीचे असणे । धरिला नामा तेणें पांडुरंगें ।। तंव तो पळत कोळपी घातली । त्या क्षणी न बोले देवाशी जो । देव म्हणे नाम्या

पाहे परतोन । तुज मी शरण आलो असे ।। अशा प्रकारे देवाने नामदेवांची खूप मनधरणी केली व शेवटी

मग धरूनि मनगटी चालनिला नामा । मोठा आला प्रेमा विठोबासी ।।

**नामदेवाचा अहंकार व अभिमान :–** अशा प्रकारे पांडुरंग नामदेवांचे कोड-कौतुक पुरवीत असे. त्यामुळे या जगात यापेक्षा अधिक काही मिळवावयाचे आहे याची जाणीव नामदेवांना नव्हती. पांडुरंगाशी बोलणे, हसणे, खेळणे व प्रेमकलहादी करणे हीच परमोच्च स्थिती, हीच कृतार्थता व हीच धन्यता असा त्यांचा समज झाला होता. पण हा त्यांचा समज अगदी चुकीचा होता. कारण एकदा नामदेव आळंदीस गेले होते. तेथे त्यांची ज्ञानदेवादी चारही भावंडांशी भेट झाली. पंढरीचा प्रेमळ भक्त आपल्या भेटीला आला हे पाहून निवृत्तीरायांनी नामदेव-रायांना प्रदक्षिणा केली व त्यांच्या चरणाचे दर्शन घेतले. त्यानंतर ज्ञानेश्वरमहाराज उठून उभे राहिले व त्यांनी नामदेवांच्या पायावर मस्तक ठेवून नमस्कार केला. सोपानरायांनी तर सन्मुख होऊन नामदेवराय हे प्रत्यक्ष पांडुरंगच आहेत अशा पूर्ण श्रद्धेने त्यांच्या चरणांना वंदन केले. ते म्हणाले, " हे नामदेवा ! आपण आम्हा अनाथांचे संत मायबाप आहात, म्हणून तुम्ही प्रत्यक्ष येऊन आम्हा रंजल्या गांजल्यांचा समाचार घेतलात. आपणास आलिंगन देण्यात आम्हाला इतका आनंद झाला आहे की जणू काही आज आमचे आईबापच आम्हाला भेटले आहेत.

परंतु अहंकारामुळे व अभिमानामुळे नामदेवांनी त्यांना नमस्कार केला नाही. त्यांना वाटले–

देवाचे जवळी आम्ही निरंतर । यासीं अधिकार नमस्कारा ।। नित्य समागम हरीच्या चरणी । हे आणि आम्ही देवभक्त ।। नामा म्हणे काय वंदू यांचे चरण । अंगे परब्रह्म मजपाशी ।।

तिघा बंधूंनी नमस्कार केला तरी मुक्ताईने नामदेवांना वंदन केले नाही. नामदेवांच्या अभिमानाची व अहंकाराची तिला तीव्र घृणा आली. त्यामुळे तिने त्यांची जहाल शब्दात कडक निर्भत्सना केली.

अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाही गेला ।। १ ।। मान अपमान वाढविसि हेवा । दिवस असता दिवा हाती घेसी ।। २ ।। परब्रह्मासंगे नित्य तुझा खेळ । आंधळ्या डोळे डोहाळे कां वा झाले ।। ३ ।। कल्पतरू तळवटी इच्छिली ते गोष्टी । अद्याप नरोटी राहिली का ।। ४ ।। घरी कामधेनू ताक मागू जाय । ऐसा द्वाड आहे जगामाजी ।। ५ ।। म्हणे मुक्ताबाई जाईना दर्शना । आधी अभिमाना दूर करा ।। ६ ।।

मुक्ताबाई म्हणाली, अहो नामदेवराया ! आपणाला पांडुरंगाचा सहवास आहे. तरीही आपला अहंकार गेला नाही हे आश्चर्य आहे ! दिवसा दिवा हातात घेणे जितके मूर्खपणाचे आहे तितकेच पांडुरंगाचे सानिध्य असता मान, अपमान,

हेवा इत्यादि दुर्गुणांना स्थान देणे मूर्खपणाचे आहे. आपण परब्रह्मस्वरूप पांडुरंगाशी नेहमी खेळता व बोलता अशा वेळी ज्ञानस्वरूप डोळे प्राप्त झाले असताना आंधळ्याप्रमाणे जीवन जगण्याची आपल्याला इच्छा व्हावी याचे फार आश्चर्य वाटते. परब्रह्म पांडुरंग हे कल्पतरू आहेत. त्यांच्या शीतल छायेत आपण राहाता. आपण मनात आणाल तो संकल्प पूर्ण होईल. अशावेळी आपण नारळाची नरोटी हातात ठेवून त्यातचं सुख मानू लागाल तर ते शोभून दिसणार नाही. कामधेनु-प्रमाणे पांडुरंग आपल्या घरी राहिले आहेत. अशावेळी आपण तुच्छगोष्टींकडे लक्ष देता हे बरोबर नाही. अशा या अभिमानी व अहंकारी माणसाचे मी कधीही दर्शन घेणार नाही. याचा अभिमान नष्ट केलाच पाहिजे.

**भक्तीच श्रेष्ठ आहे** :—नामदेवांची अशी अवस्था अज्ञानामुळे झाली होती. त्यांना आत्मसाक्षात्कार झाला नव्हता. त्यामुळे त्यांना द्वैतातच सुख वाटत होते. भक्तीच श्रेष्ठ वाटत होती. आपल्या भक्तिप्रभावाने आपण देवाला वश केले असून ऋणकरी करून ठेवले आहे असा त्यांचा ठाम विश्वास होता. आपल्या प्रमाणेच ज्यांनी देवाला वश केले त्या कबीर, रोहिदास इत्यादी भाविक भक्तांची धन्य होय असे ते म्हणत. एवढेच नव्हे तर "त्यांची पायधुळी वंदिता कपाळी। वंशही समूळी उद्धरती ॥" असे त्यांना मनापासून वाटत होते. या दृढ श्रद्धेमुळे नामदेवांनी मुक्ताईला अगदी स्पष्टपणे सांगितले की, "**भक्तिहूनि श्रेष्ठ आणिक नाही**।" अशा प्रकारे द्वैतभक्तीहून जगात काहीही श्रेष्ठ नाही हा सिद्धांत नामदेवांनी मुक्ताईला सांगितल्यावरोवर तिने त्यांची पुन्हा खरड काढली.

**गुरूपदेशाशिवाय सर्व व्यर्थ होय** :—नामदेवांची हरिभक्ती ही कःपदार्थ असून आत्मनिष्ठाच श्रेष्ठ आहे व ती सद्गुरुशिवाय कधीही प्राप्त होणार नाही हे मुक्ताईने नामदेवांना अगदी निःशंकपणे सांगितले. ती म्हणाली —

**नामदेवांना आंतली सोय कळली नाही.**

झालासी हरिभक्त तरी आम्हां काय। आंतली ती सोय न ठाऊकी ॥ १ ॥ घेऊनी टाळदिंडी हरिकथा करिसी। हरिदास म्हणविसी श्रेष्ठपणें ॥ २ ॥ गुरूविण तुज नव्हेचि गा मोक्ष। होशील मुमुक्षु साधक तूं ॥ ३ ॥ आत्मतत्त्वीं दृष्टी नाहींच पां केली। तंववरी ब्रह्मबोली बोलुनी काय ॥ ४ ॥ तुझें रूप तुवा नाही ओळखिलें। अहंतेते धरिले कासयासी ॥ ५ ॥ आमुचें तूं मूळ जरी पुसतोसि। तुझें तूं आपैसी पाहूनि घेई ॥ ६ ॥ ऐक रे नामया होई आत्मनिष्ठा। तरिच तू श्रेष्ठ ज्ञानी म्हणो ॥ ७ ॥

मुक्ताई म्हणाली, "अहो नामदेवराया। तुम्हाला अद्याप आपल्या अंतरात्म्याची ओळख झालेली नाही" राम राम सर्वही म्हणती। कोणीं न जाणती आत्माराम" या उक्तिप्रमाणे जो पर्यंत आत्मारामाची आतून ओळख पटत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ होय. यामुळे तुमच्या अत्यंत श्रेष्ठ अशा भगवद्भक्तीची किंमत

आमच्या दृष्टीने शून्यवत् आहे. तुम्ही हातामध्ये टाळविणा घेऊन हरिकथा करता व स्वतःला मोठे हरिदास म्हणवून घेता. यामुळे आपण फारतर मुमुक्षू व साधक व्हाल. परंतु गुरूशिवाय मात्र तुम्हास मोक्ष कदापीही मिळणार नाही. कारण जोपर्यंत गुरू शक्तिपात करणार नाहीत तोपर्यंत खरी कृपा झाली असे कालत्रयीही म्हणता येणार नाही. अशा कृपेमुळेच आत्मतत्त्वाकडे दृष्टी आपोआप वळते. अशाप्रकारे आत्मज्ञान जोपर्यंत होत नाही तोपर्यंत ब्रह्मासंबंधी भाषा करण्यात काहीही स्वारस्य नाही. त्यासंबंधी काहीही अनुभव नसताना बोलणे ही अगदी निरर्थक व व्यर्थ बडबड होय. तुम्ही आपल्या आत्मस्वरूपाला अजून ओळखले नाही. त्यामुळे तुम्ही व्यर्थ अभिमान व अहंकारादी दुर्गुणांच्या जबड्यात अडकून पडला आहात. तुम्ही आमच्या मुळासंबंधी विचारीत आहात. परंतु ते सांगून समजणार नाही. ज्याचा त्यानेच त्याचा अनुभव घ्यावयाचा असतो. सद्‌गुरु जेव्हा शक्तिसंचार करतात तेव्हा मायाजल संपून मुळाचा म्हणजे स्वस्वरूपाचा अनुभव येतो. आपण आपली सोय या दृष्टीने पाहून घ्या. असे झाले म्हणजे आपल्याला आपणाला सहज पाहून घेता येईल. अशारीतीने आपण आत्मनिष्ठ व्हा. हीच खरी भक्ती आहे. असे झाले म्हणजे आम्ही तुम्हाला खरे ज्ञानी म्हणू.

मुक्ताईने नामदेवांना हा उपदेश अगदी तटस्थ राहून धैर्याने केला. नामदेव पांडुरंगाचे प्रसिद्ध लाडिक भक्त म्हणून तिने त्यांची यत्किंचितही गय केली नाही. आपले सर्व बंधू त्यांच्या चरणावर विनम्र झाले म्हणून आपणही त्यांच्या चरणावर लोळण घेतली पाहिजे असे तिला वाटले नाही. मुक्ताई ही आत्मबोधाची जणू काही मूर्तिमंत प्रतिकच होती. तिला नामदेवासारख्या भक्ताच्या ठिकाणचे हिण सहन झाले नाही. ते जावे व नामदेव कृतार्थ व्हावेत या सद्हेतूने तिने त्यांचे सर्व दोष अगदी उघडे करून सांगितले. ती म्हणाली, हे नामदेवा ! जोपर्यंत तुला आत्मबोध होणार नाही तोपर्यंत तुला मी केव्हाही संत म्हणणार नाही. आत्मज्ञाना व्यतिरिक्त पंचम पुरुषार्थादिक इतर सर्व साधने म्हणजे धान्याशिवाय कणीस किंवा प्राणाशिवाय शरीर होत."

**नामदेव अंतरी कोरे आहेत** :—एवढे बोलून ती थांबली नाही. तिने नामदेवांची अगदी कडक शब्दात निर्भर्त्सना केली. ती म्हणाली, बोलोनिया येणे वाढविला डांगोरा। अंतरीचा कोरा गुरूवीण ।। १ ।। संताचा सन्मान कळेना जयासी। राहुनी देवापाशी काय केले ।। २ ।। परिसा झांकण घातले खापर। नाही झाले अंतर बावन कस ।। ३ ।। खदिरांगारी श्रृंगारी हिलाल। अंतरीचे काळे गेले नाही ।। ४ ।। म्हणे मुक्ताई अभिमानाने नेले। सर्पा पाजियेलें विष तेंचि ।। ५ ।।

नामदेवांनी बोलबाला करून उगाच आपल्या नावाचा डांगोरा पिटला आहे. परंतु खरे पाहिले तर मात्र गुरूपदेश घेतलेला नसल्यामुळे हे आतून कोरडेच राहिले आहेत. खरे ज्ञान यांना झाले नाही. गुरूशिवाय अंतस्थ परमात्म्याची ओळख होणे

कदापीही शक्य नाही. नामदेवांना संतांचा सन्मान कसा करावा हेही कळत नाही. त्यांच्यासारख्या माणसांनी देवापाशी राहून काय कमावले हाच प्रश्न पडतो. परिसाला खापराने झाकले म्हणून खापराचे सोने झाले असे दिसून येत नाही. त्याचप्रमाणे नामदेव नुसते देवाच्या सान्निध्यात राहिले म्हणून त्यांना ज्ञान झाले व ते कृतार्थ झाले असे म्हणता येणार नाही. या दृष्टीने पाहिले तर त्यांचे जीवन फुकट गेल्यासारखेच आहे. हिलाल म्हणजे मशाल. ती पेटविल्यावर खदीरांगारासारखी धगधगीत होते. परंतु ती आत जशी काळी असते तशीच असते. वरच्या ज्वाळांच्या रूपाने तिचे अंतस्थ काळेपण काही काळ झाकले जाते एवढेच. त्याचप्रमाणे वरवर नामदेव भक्त दिसले, देव त्यांच्याशी बोलतो असे वाटले व त्यांच्या भक्तीचा सर्वत्र उदोउदो दिसला तरी अहंकारादी दोषांनी त्यांचे अंतरंग भरलेले असल्यामुळे त्यांची शुद्धता झाली नाही. सापाला दूध पाजले तरी त्याचे विषच होते. त्याचप्रमाणे भक्तीच्या अभिमानाने नामदेवांचे सर्व जीवन विषमयच झाले आहे.

**नामदेवांची भक्ती बेगडी आहे :**—नामदेवाची भक्ती बेगडी आहे. त्यांना सद्‌गुरु कृपेचे रहस्य न कळल्यामुळे ते वरवरच गुंतून राहिले आहेत. आपल्या अमृतस्वरूपाची त्यांना ओळख झालेली नाही. हे पटवून देताना मुक्ताई म्हणते— अमृत टाकून कांजीची आवडी । साजेना झोपडी काय त्याला ॥ १ ॥ खरासी अखंड गंगेचे स्नान । गेले वायावीण जिणें त्याचे ॥ २ ॥ पोवळ्याहून अधिक दिसती रानगुंजा । श्रृंगाराच्या काजा विटंबिल्या ॥ ३ ॥ आनारापरिस चोखट इंद्रावण । चवी कडूपण हीन त्यांचे ॥ ४ ॥ रंगाची बाहुली दिसती साजिरी । बेगडाचे वरी नग ल्याली ॥ ५ ॥ म्हणे मुक्ताबाई पुरे ते दर्शन । गुरुवीण संतपण आहे कोठे ॥ ६ ॥

कांजीला म्हणजे वरवरच्या भक्तीला भुलून नामदेवांनी अमृताकडे म्हणजे आत्मस्वरूपाकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले. अशाप्रकारे जे लोक सामान्य गोष्टीत गुंतून राहातात त्यांना झोपडीच शोभून दिसते. आत्मस्वरूपाच्या अलौकिक व दिव्य घरातील आनंद त्यांना माहीत नसल्यामुळे वरवरच्या भक्तिरूपी झोपडीतच त्यांचे सुख सीमित होऊन राहाते. एवढेच नव्हे तर अभिमान, दंभ, अहंकार इत्यादी मध्येच ते गुरुफटून जातात. या दोषांमुळे आत्मस्वरूपाकडे मन वळणे मोठे दुष्कर होते. गाढवाला गंगेचे स्नान नित्य घातले तरी ते व्यर्थ जाते. त्याचप्रमाणे अशा माणसांना कितीही सांगितले तरी त्यांची दृष्टी ही अंतर्मुख होत नाही. रानातील गुंजा या पोवळ्यापेक्षाही लाल व सुंदर दिसतात. त्या गुंजांना भुलून त्याचे अलंकार करून घातले तर ती शुद्ध विटंबनाच आहे असे म्हटले पाहिजे. त्याचप्रमाणे नामदेवांची भक्ती ही वरवर सुंदर व गोड दिसली तरी आत्मदर्शी झालेली नाही. त्यांना त्या भक्तीचा कितीही गोडवा वाटला व त्यात ते कितीही रंगून गेले तरी शुद्ध आत्मस्वरूपाची जोपर्यंत ओळख झाली नाही तोपर्यंत ही वरवरची भक्ती

म्हणजे शुद्ध विटंबना आहे. नामदेवांचे जीवन कृतार्थ होण्याला तिचा काहीही उपयोग नाही. डाळिंबापेक्षा कडू वृक्षाची फळे मोठी सुंदर दिसतात. तरी ती खाताना कडूच लागतात. भक्तीचे वरवरचे स्वरूपही असे सुंदर दिसले तरी ती साधकाला आत नेऊन पोहचविण्यास व शुद्ध आत्मस्वरूपाची ओळख करून देण्यास असमर्थ असते. जीवावरील अज्ञानाचे आवरण तिच्यामुळे दूर होऊ शकत नाही. एखाद्या मातीच्या बाहुलीला रंग लावून तिला बेगडाचे दागिने घालून सजविले म्हणजे ती वरवर सुंदर दिसली तरी तिच्यातील वैय्यर्थ जाणकार जाणू शकतो. त्याचप्रमाणे नामदेवांची भक्ती ही बेगडी असून व्यर्थ आहे. याचे खरे कारण असे आहे की अजून-पर्यंत त्यांच्यावर गुरुकृपा झाली नाही. त्यामुळे त्यांना अजून संतपण आलेले नाही.

**अहंकारसर्पाचा नामदेवांना वेढा :–** मुक्ताबाईने नामदेवांच्या खोट्या भक्तीचे पितळ उघडे पाडण्याचा चंगच बांधला होता. त्यामुळे ती त्यांना म्हणाली.

उंसाचे शेजारी एरंडाची झाडे । नाही त्या चिपाडे गोडी आली ॥ १ ॥ कर्पुरासी झाला दीपाचा शेजार । काय गुणे हीर राहिल त्याचा ॥ २ ॥ सागरी लवण टाकिले नेऊन । काय गुण खडेपण उरले त्याचे ॥३॥ तैसा नामदेव विठोबाच्या जागा । काय गुणे या गा कोरेपणा ॥४॥ म्हणे मुक्ताबाई चंदनाचे झाड । अहंता सर्प वेढे गुंडाळिले ॥ ५ ॥

ऊंसाचे शेजारी एरंडाची झाडे लावली तरी त्याच्या सालीत काही गोडी येत नाही. त्याचप्रमाणे नामदेव पांडुरंगाच्या सहवासात राहिले तरी त्यांच्यात कसलाही पालट घडून आला नाही. ते कोरडेच राहिले. कापराचा अग्नीशी संपर्क झाल्यावरोबर तो अग्निस्वरूप होतो. त्याचा आकार जातो. कठिणपणा विरतो. अग्निसंपर्कामुळे त्याचे अस्तित्वच नाहीसे होते. परंतु पांडुरंगाच्या सहवासात राहूनही नामदेवांचा अहंकार, कठीणपणा, जडता इत्यादी दूर झाले नाही. ते स्वत:ला विसरून जाऊ शकले नाही. समुद्रामध्ये मीठ पडले की ते विरून जाते. एकरूप होते. तसे नामदेवांचे पांडुरंगाच्या सहवासाने व्हावयास पाहिजे होते. पांडु-रंगरूपी आत्मस्वरूपाशी त्यांची एकरसता व्हावयास हवी होती. पण पांडुरंगाच्या बाह्यस्वरूपाला नामदेव भुलून गेल्यामुळे त्यांनी डोळे मिटून अंतरंगातील पांडुरंगाचा शोध घेण्याचा प्रयत्नच केला नाही. त्यामुळे ते कोरडे व अज्ञानी राहिले. विठोबाच्या सहवासाचा त्यांच्यावर कसलाही परिणाम झाला नाही. नामदेव हे चंदनाच्या वृक्षासारखे आहेत. परंतु त्यांचा अहंकार हा सापाप्रमाणे त्यांना वेढून राहिला आहे.

मुक्ताईच्या मनात नामदेवांना खऱ्याखुऱ्या आत्मस्वरूपाचा बोध व्हावा अशी तीव्र तळमळ होती. त्यामुळे चांगदेवांना ज्ञानदेवांनी ज्या शक्तिपातयोग साधनाने भाजून पक्के केले तसेच नामदेवही पक्के झाले पाहिजेत असे तिचे स्पष्ट मत होते.

संत पाहुणेरा सज्जनाचें घरीं । पूजा करीतां वरी डोई काढी ॥ १ ॥ करीता सन्मान अंगी भरे ताठा । देवा पैं करंटा असुनी काय ॥ २ ॥ अहंता हा खुंट वाढविला चित्तीं । न साहे संगती सज्जनाची ॥ ३ ॥ पंढरीचें भूषण सांगतो जनासी । नाहीं या मनासी तीळबोध ॥ ४ ॥ म्हणे मुक्ताबाई चांगदेवावाणी । भाजावा सज्जनीं नामदेव ॥ ५ ॥

संत सज्जनांकडे हे नामदेव पाहुणे म्हणून आले. वास्तविक त्यांनी संतांची पूजा करावयास हवी होती. परंतु संतांनीच यांचा सन्मान केला. यांनी मात्र नम्रपणा धारण केला नाही. अहंकार व अभिमान यांच्यामुळे संतांपुढे यांची मान काही लवली नाही, उलट यांचा सन्मान करीत असता यांच्या अंगी जणू काही अहंकाराच्या भुताचा संचार झाला. असे हे नामदेव अगदी करंटे आहेत. देवाजवळ राहून यांना काहीही उपयोग झाला नाही. आपण देवाचे भक्त आहोत, भक्तीच श्रेष्ठ आहे, पांडुरंग आपल्याशी बोलतो इत्यादी गोष्टींमुळे यांच्या चित्तामध्ये अहंकार ठाण मांडून बसला आहे. त्यामुळे सज्जनांच्या संगतीबद्दल यांना आदर वाटत नाही. आपण पंढरपूरचे भूषण आहोत असे ते जगाला भासवीत आहेत. परंतु त्यांना अजून खरा बोध तीळमात्र सुद्धा झाला नाही. नामदेवांना कोणीतरी गुरु भेटून त्यानें चांगदेवाप्रमाणे शक्तिपात योगाने त्यांना भाजून पक्के करावें हेच खरे.

चांगदेव चौदाशे वर्षे जगले परंतु जो पर्यन्त त्यांना परंपराप्राप्त बोध झाला नाही, शक्तिसंक्रमणाची प्रक्रिया घडली नाही व शक्तिपाताने खरा ज्ञानाग्नी उत्पन्न झाला नाही तोपर्यंत त्यांचे आयुष्य वाया गेल्यासारखे होते. परंतु जेव्हा ते ज्ञानेश्वरांना शरण आले तेव्हा ज्ञानेश्वरांनी नाथपरंपरेने प्राप्त झालेल्या सामर्थ्याने त्यांचा उद्धार केला.

चौदाशे वरूषे शरीर केले जतन । बोधाविण शीण वाढविला ॥ १ ॥ नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश । परमार्थासी दोष लावियेला ॥ २ ॥ स्वहिताचे कारण पडियेले जेव्हां । शरण आला तेव्हा अलंकापुरी ॥ ३ ॥ गैनीनाथें गुज दिले निवृत्तीला । निवृत्तीचा झाला ज्ञानदेव ॥ ४ ॥ ज्ञानदेवी बीज वाढलेसे जनी । तेचि आम्ही तुम्ही संपादले ॥ ५ ॥ म्हणे मुक्ताबाई तिन्ही लोकी ठसा । नामदेव ऐसा राहिला का ? ॥ ६ ॥

चांगदेवरायांनी आपले शरीर चौदाशे वर्षे जतन केले. परंतु एवढ्या दीर्घकाळात शक्तिपात करणारा गुरूच त्यांना भेटला नाही. त्यामुळे खरा बोध व कृपा झाली नाही. नुसता शीण मात्र वाढला. सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. गुरुमंत्राच्या द्वारे किंवा उपदेशाने शक्तिसंक्रमण घडून येऊन मल, विक्षेप, आवरणादी दोष गेले नाहीत. त्यांच्या या कृतीने परमार्थाला मात्र कमीपणा आला. जेव्हा त्यांचे डोळे उघडले तेव्हा त्यांना आपले स्वहित व्हावे असे वाटू लागले. त्यामुळे शेवटी ते श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांना शरण गेले. ज्ञानेश्वरांना हे परंपराप्राप्त ज्ञान शक्ति-

संक्रमण होउन मिळाले होते. ज्ञान हा नुसता सांगण्याचा व ऐकण्याचा विषय नसून तो प्रत्यक्ष देण्याचा व घेण्याचा विषय असल्याने गैनीनाथांनी शक्तिपाताची दीक्षा देऊन आपले गूज म्हणजे आत्मज्ञानच निवृत्तीनाथांच्या ठिकाणी संक्रमित केले. निवृत्तीनाथांनी ज्ञानदेवांना दीक्षा देऊन कृतार्थ केले. ज्ञानदेवांनी या महेशान्वयसंभूत अशा शक्तिपाताच्या महान योगविद्येच्या बीजाचा सर्व जगात विस्तार केला. त्यांनी सर्व लोकांना कृपाळू होऊन हा मार्ग मोकळा केल्यामुळे व उदार अंतःकरणाने ही शक्तिपाताची विद्या सर्वांना दिल्यामुळे त्याचा प्रसाद तुम्हाला व आम्हाला मिळन आपण कृतार्थ झालो. अशा रीतीने या साधनमार्गाचा अर्थात शक्तिपात योगविद्येचा तीन लोकांमध्ये ठसा उमटलेला असताना हा नामदेव कोरा राहिला हे आश्चर्य आहे.

अशा प्रकारे मुक्ताईने नामदेवांना आपली प्रंपरा सांगून शक्तिपातयोगाचे माहात्म्यहि वर्णन केले. तिच्या दृष्टीने नामदेव कच्चे होते. ते पक्के व्हावेत असे तिला वाटत असल्याने " नामदेवांना पक्के भांडे केल्याशिवाय जाऊ देऊ नका " असे तिने सर्व बंधूंना सुचविले. ती म्हणाली,

कुलाल आपुल्या घरी भाजवी भाचरी । म्हणिजे होईल हरि कृपावंत ।। १ ।। हरीसी वरदळ लावितो निशदिनी । धाडिला म्हणोन तुम्हापाशी ।। २ ।। तुम्ही संतजन उद्धाराल तत्काळ । नामा लडिवाळ विठोबाचा ।। ३ ।। राखावें तें ब्रीद करावे पावन । धाडा बोलावणे गोरोबाला ।। ४ ।। म्हणे मुक्ताबाई भाजले की कोरे । काकाचे उत्तर सत्य मानू ।। ५ ।।

कुलाल आपल्या हाळामध्ये ज्याप्रमाणे मडके भाजून पक्के करतो त्याप्रमाणे नामदेवांना एखादा सद्‌गुरू भेटून त्याच्याकडून शक्तिपातपूर्वक कृपा होऊन ज्ञानाग्नीत भाजून पक्के केले पाहिजे. असे झाले म्हणजे भगवंतांची खरी कृपा झाली असे म्हणता येईल. जोपर्यंत शक्तिपात होत नाही तोपर्यंत खरी कृपा झाली असे म्हणता येणार नाही. बाह्यतः भक्ती, प्रेम, उपासना, कर्म इत्यादी गोष्टी कितीही मोठ्या दिसल्या तरी हेतू सिद्ध होण्याच्या दृष्टीने त्यांचा उपयोग अगदी प्राथमिक स्वरूपाचा असतो. जीवाची गती जी अधोमुख होऊन संसारात प्रवृत्त झालेली असते ती पालटून जाऊन ऊर्ध्वमुख होऊन शिवस्वरूप होण्यासाठी शक्तिपात होणे अगदी अपरिहार्य असते. अन्य कोणत्याही उपायाने हे होणे शक्य नाही. नामदेव हा बाह्य गोष्टीत गुंतून राहिला तर कोरा राहील व त्याचे खरे कल्याण होणार नाही म्हणून पांडुरंगानेच नामदेवाला आपल्याकडे पाठविले आहे. नामदेव हे विठोबाचे अत्यंत प्रेमळभक्त असल्याने तुम्ही सर्व संतांनी याच्या उद्धाराची त्वरित सोय केली पाहिजे. गोरोबाकाकांना बोलावून नामदेवांची आधी परीक्षा केली पाहिजे. असे केले म्हणजे लोकोद्धाराचे आपले ब्रीद कायम राहील व नामदेवही पावन होतील. नामदेव पक्के किंवा कोरे याचा निर्णय गोरोबाकाकाच घेऊ शकतील. ते जे सांगितील व जो निर्णय देतील त्यालाच आपण मान्यता देऊ.

**तत्त्वप्राप्ती हीच खरी कृतार्थता.**– मुक्ताबाईच्या दृष्टीने अनुभव हाच सर्वश्रेष्ठ आहे. नुसत्या बाह्य गोष्टीत व बडबडण्यात काही अर्थ नाही असे तिचे स्पष्ट मत आहे. अव्यक्त परब्रह्मास नामदेव शरण गेले पाहिजेत असे तिला वाटत होते. नामदेवांनी आपण आपल्याला ओळखले पाहिजे व कृतार्थ झाले पाहिजे असे ती त्यांना पटवून देत होती. यासाठी तिने प्रथम त्यांचे सर्व दोष सांगून सद्गुरूला शरण गेल्याशिवाय तत्त्वप्राप्ती होणार नाही असे सांगितले. त्यानंतर सद्गुरुकृपेने शक्ती जागृत झाल्यावर प्रत्यक्ष काय अनुभव येतो याचे तिने वर्णन केले आहे.

मोतियांचा चुरा फेकिला अंबरी । विजुचीया परी कीळ झाले ॥ १ ॥ जरी पितांबरे नेसविली नभा । चैतन्याचा गाभा नीळबिंदू ॥ २ ॥ तळीवरी परसे शून्याकार झाले ॥ सर्पाचीही पिले नाचू लागे ॥ ३ ॥ कडाडोनी वीज निमालीच ठायीं । भेटली मुक्ताई गोरोबाला ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे कैशी झाली भेट । ओळखिले अविट आपुलेपण ॥ ५ ॥

शक्तिसंक्रमण होऊन शक्ती ऊर्ध्वमुखी झाल्याबरोबर ब्रह्माभिव्यक्तीची चिन्हे दिसू लागतात. श्वेताश्वतर उपनिषदात याचे वर्णन करताना अध्याय २ मंत्र ११ मध्ये म्हटले आहे "नीहारधूमार्कानिलानलानां खद्योतविद्युत्स्फटिकशशीनाम् । एतानि रूपाणि पुरःसराणि ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे ॥ म्हणजे योगाभ्यासाला सुरवात झाल्यावर जाडप्रतीचे धुके, धूर, सूर्य, वायू, अग्नी, काजवा, विजेची चमक, स्फटिकमणी ही ब्रह्माची अभिव्यक्ती करणारी रूपे प्रकट होतात.

त्याचप्रमाणे सूर्यगीता व उमा संहितेच्या २७ व्या अध्यायात शक्तिजागृतीमुळे येणाऱ्या दिव्य अनुभवांचे वर्णन केले आहे.

यदा कुंडलिनीशक्तिराविर्भवति साधके । तदा स पंचकोशे मत्तो जो ऽनुभवति ध्रुवम् ॥ ततस्तु तमसि ध्यानी पश्यति ज्योतिरैश्वरम् । श्वेतं रक्तं तथा पीतं कृष्णमिद्रायुधप्रभम् ॥ भ्रुवोर्मध्ये ललाटस्थं बालार्क समतेजसम् । दर्शनं नाम दिव्यान दर्शनं चा प्रयत्नतः॥

ज्यावेळी कुंडलिनीशक्ती साधकात क्रिया रूपाने प्रकाशित होते तेव्हा साधकाला अन्नमय, प्राणमय, मनोमय आदी पचकोशांमध्ये माझ्या सूर्यरूप ज्योतिर्मय अशा तेजाचा निश्चितपणे अनुभव येतो. साधनाच्या वेळी साधक अंधकारमय अंतराकाशात ज्योतिरूप ईश्वराचे दर्शन घेतो. ती ज्योत पांढरी, लाल, पिवळी, काळी किंवा इंद्रधनुष्यातील रंगांप्रमाणे नानाप्रकारच्या रंगांची असते. ती ज्योत भ्रूमध्यललाटाच्या ठिकाणी प्रातःकाली उगवलेल्या सूर्याप्रमाणे दिसते. यालाच दिव्य दर्शन म्हणतात. सद्गुरुकृपेने शक्ती जगृत झाल्यावर अशी दर्शने आपोआप स्वतः होतात.

या सर्व विवेचनावरून शक्ती जागृत झाल्यावर साधकाला अनुभव कसे येतात हे लक्षात येईल. याच्या आधाराने मुक्ताबाईच्या अभंगाचा अर्थ उत्तम लावता येईल. ज्यावेळी शक्ती जागृत होऊन अर्धोन्मनी आली त्यावेळी मोत्याचा

चुरा आकाशात फेकल्याप्रमाणे दृश्य दिसू लागले. सर्वत्र झगझगाट दिसू लागला. विजेसारखा प्रकाश सर्वत्र पसरेलेला दिसला. आकाशाला जणू काही पिवळे रेशमी वस्त्र नेसविले आहे असे वाटू लागले कारण सर्वत्र पिवळ्या रंगाचे दर्शन होत होते. त्यातच निळ्याबिंदूचे म्हणजे निळसर रंगाच्या ज्योतीचे दर्शन होत होते. ही ज्योत म्हणजे चैतन्याचे स्वरूपच होय. सर्पाच्या आकाराप्रमाणे भासणारी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ब्रह्मरंध्राकडे गेल्याने वृत्तिनिरोध होऊन शून्याकार अशी समाधी स्थिती उत्पन्न झाली. वीज कडकडून चमकावी आणि ती आपल्या ठिकाणी लुप्त व्हावी त्याप्रमाणे स्वस्वरूपात मुक्ताबाई स्थिर होऊन तिची व गोरोबांची दिव्य भेट झाली. अशी साम्यस्थिती म्हणजेच गोरोबांची भेट होय. आपले अविट आपलेपणा ओळखणे म्हणजे कधीही न विटणारे अनादिसिद्ध ब्रह्मस्वरूप आपण आहोत हे जाणणे म्हणजेच खरी भेट होय असे श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

मुक्ताबाईनी अशाप्रकारे स्वानुभव सांगून नामदेवांना जागृत करण्याचा प्रयत्न केल्यावर निवृत्तीनाथांनाही त्यांच्याबद्दल करुणा उत्पन्न झाली. नामदेवांनाही आपल्याला मिळाला तसा सोपा मार्ग मिळावा, त्यांना स्वरूपप्राप्ती व्हावी व ते कृतार्थ व्हावेत म्हणून त्यांचा जीव थोडा थोडा होऊ लागला. आपण ज्या मार्गाने आपल्या अनादि स्वरुपात स्थिर झालो त्याचे स्वरूप त्यांनी नामदेवांना सांगितले आहे.

निवृत्तिदेव म्हणे चला गुंफेमध्ी । अचळ हे आदि समाधी असे ।।१।। सद्गुरु-प्रसादे बोधिली नेटकी । गुहचे गोप्यताटी आड केली ।।२।। दंड चक्राकार बांधिली चहूंकून । आंत संतजन करिती वास ।।३।। ऐसे गुंफेमध्ये नाहीं नामदेव । म्हणुनी माझा जीव थोडा होतो ।। ४ ।। गैनीची मिरास घेतला प्रमाण । पूर्वभूमी जतन करित आस ।। ५ ।। निवृत्तिदेव म्हणे मुक्ताईच्या उत्तरे । भाजले की कोरें कळों नेदी ।। ६ ।।

निवृत्तीनाथांनी या अभंगात ज्या गुंफचे वर्णन केले आहे तिचा खरा अर्थ समजला म्हणजे अभंमाचे रहस्य उलगडेल. शिवसंहितेच्या पंचमपटलामध्ये या गुंफेला विवर म्हटले असून त्याचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे.

अतऊर्ध्वं तालुमूले सहस्रारं सुशोभनम् । अस्ति यत्र शुषुम्णाया मूलं सविवरं स्थितम् ।। तालुमूले शुषुम्णा सा अधोवक्त्रा प्रवर्त्तते । मूलाधारेण योन्यान्ता सर्वा नाडी समाश्रिताः ।। तावीज भूतास्तत्त्वस्य ब्रह्ममार्ग प्रदायिका ।।

शरीरातील ऊर्ध्वभाग मस्तक आहे. तेथे टाळूच्या मुळाशी सहस्रार नावाचे सातवे कमल सुशोभायमान अवस्थेत असते. शुषुम्णानाडीचे दुसरे टोक ब्रह्मरंध्राच्या विवरात म्हणजे गुंफेतच येऊन मिळते. शुषुम्णानाडी टाळूपासून निघून अधोमुख होऊन मूलाधारापर्यंत गेली आहे किंवा मूलाधारापासून निघून ऊर्ध्वमुख होऊन ती टाळूपर्यंत आलेली आहे. मूलाधारामध्ये असलेलें शुषुम्णेचे पहिले मुख्यद्वार निद्रित कुंडलिनी महाशक्तीमुळे बंद असते. परंतु तिचे मस्तकातील टाळूजवळील ब्रह्म-

रंध्राचेद्वार मोकळे असते. ही शुषुम्णा शरीरातील मूलाधारापासून निघणाऱ्या सर्व नाड्यांचा आश्रय असून ती ब्रह्मांडाच्या ज्ञानाचे बीजच आहे. तिच्यामध्ये संपूर्ण ब्रह्मांड विद्यमान असते. ही शुषुम्णाच मूलाधारापासून सहस्रारापर्यंत अध्यात्म तत्त्वाचे खरे दर्शन घडविणारी व ब्रह्ममार्ग प्राप्त करून देणारी नाडी आहे.

या सहस्रार गुंफेचे माहात्म्य सांगताना शिवसंहितेत पुढे म्हटले आहे की–

अतऊर्ध्वं दिव्यरूपं सहस्रारं सरोरुहम् । ब्रह्मांडाख्यस्य देहस्य बाह्ये तिष्ठति मुक्तिदम् ।। कैलाशोनाम तस्यैव महेशो यत्र तिष्ठति । नकुलाख्यो विलासी च क्षय वृद्धिः विवर्जितः ।। यस्य स्मरणमात्रेण ब्रह्मज्ञत्वं प्रजायते । पापक्षयश्चभवति न भूयः पुरुषो भवेत ।।

सर्वात अत्युच्य स्थानी सहस्रारामध्ये सहस्रदल कमल विद्यमान असते. बाहेर जशी ब्रह्मांडाची रचना असते तशीच या देहामध्ये सुद्धा असते. शरीरातील हे स्थान प्रत्यक्ष जीवनमुक्ती देणारे असते. हे स्थान कैलास नावाने प्रसिद्ध असून त्याठिकाणी भोग, ऐश्वर्य व मुक्ती देणारे साक्षात श्रीमहेश्वर विराजमान झालेले असतात. मूलाधारस्थ भूलोकापासून पाहता हे सत्यलोक नावाचे सातवे स्थान ठरते. वेदाचे असे सांगणे आहे की या ठिकाणी पोहोचल्यावर मनुष्य जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडत नाही. या ठिकाणी नित्यविलासी, क्षयवृद्धीरहित अखंड आनंदस्वरूप असलेले नकुल नावाचे सिद्धदेव श्रीमहेश्वर यांचा निवास असतो. या सातव्या स्थानात अत्यंत तेजोमय देदीप्यमान व दिव्य ज्योतिस्वरूप परम गुरु देवाधिदेव महादेव सहस्रदल कमलावर विराजमान असतात. हे स्थान गुरुतत्त्वाचे आहे. तेथे अमृतमय अशा आनंदाचा सागर पूर्णपणे भरलेला आहे. "नास्ति तत्वं गुरोः परम्" गुरुतत्त्वाच्या पलीकडे आणखी तत्त्व नाही. हे स्थान असे दिव्य असल्याने त्याचे यापेक्षा अधिक वर्णन करता येत नाही. सुषुम्णेच्या वरच्या टोकाला हे विवर ब्रह्मरंध्रामध्ये आहे. या जागी सहस्रार म्हणजे सहस्रदल कमलात गुरुतत्त्वाचे ध्यान केल्याने ब्रह्मज्ञान होऊन पापक्षय झाल्याने ध्यानी पुरुषाला पुन्हा जन्म येत नाही.

निवृत्तीनाथ म्हणतात जेथे अनादी स्थायिक समाधी आहे अशा गुंफेमध्ये आपण जाऊ. या गुहेमध्ये जाण्यासाठी गुप्त असे दार आहे. ते झाकलेले आहे. जेव्हा सद्गुरूचा प्रसाद होतो तेव्हा शक्ती जागृत होऊन हे दार उघडले जाते. त्यामुळे या गुहेमध्ये प्रवेश होऊन खरा बोध प्राप्त होतो. या गुहेमध्ये जाण्याची वाट दंडासारखी सरळ आहे. मात्र भिन्नभिन्न चक्रांनी ती बांधलेली आहे. अशा वाटेने आत जाऊन संतजन त्या गुंफेमध्ये वास करतात. परंतु नामदेवांना आजतागायत ही वाट सापडलेली नसल्याने त्यांना तेथे जाता येत नाही. त्यामुळे माझा जीव अगदी कासावीस होत आहे. या गुंफेमध्ये जाण्याचा शक्तिपातयोगाचा जो सोपा असा मार्ग आहे त्याला पंथराज म्हणतात. हा पंथराज गैनिनाथांची मिरासदारी आहे. याच्या इतका प्रमाणभूत असा सोपा मार्ग नाही. हा परंपरेने मला प्राप्त झाला आहे.

या परंपरायुक्त मार्गाचे संरक्षण करण्याची माझी इच्छा आहे. निवृत्तीनाथ म्हणतात जोपर्यंत नामदेवांची परीक्षा घेतली नाही तोंपर्यंत मुक्ताबाईच्या सांगण्याप्रमाणे ते पक्के आहेत का कोरे आहेत हे कळणार नाही.

**नाही स्वरूपस्थिती अंगा आली :–** नामदेवांना स्वरूपप्राप्ती न झाल्याने त्यांची स्थिती अद्याप खरोखर कशी आहे ते कळत नाही. यासाठी आपण संतांनी त्यांची परिक्षा करावी असे मुक्ताबाई म्हणाली.

हांसोनी सोपाने खुणविल्या खुणा । नामदेव पाहूणा आला असे ।। १ ।। तयासी हो पाक पाहिजे पवित्र । भाजलें की कळो नेदी ।। २ ।। मुक्तिचे पारखी तुम्हीं आम्हा देवा । भाजुनी जीवशिवा ब्रह्म करा ।। ३ ।। आनंदाने डुल्लती मारती करावरी कर । नेणो राहिले कोरे कोण्या गुणे ।। ४ ।। निर्गुणापासोनी सगुणाची संगती । नाही स्वरूपस्थिती अंगा आली ।। ५ ।। म्हणे मुक्ताबाई हेरोनिया हेरा । हिरा किंवा गारा नेंणो बापा ।। ६ ।।

नामदेवराय हे आपले पाहुणे म्हणून आले आहेत असे सोपानरायांनी सर्वांना हसून सांगितले. ते पूर्णपणे भाजलेले का कोरे आहेत हे काही समजत नाही. त्यांना जर पवित्र असे ब्रह्मज्ञानाचे अन्न पाहिजे असेल तर त्यांची परीक्षा योग्य रीतीने केलीच पाहिजे. आपण सर्व संतमंडळी मोत्याची पारख करणारे आहात. तेंव्हा नामदेव खरे किंवा खोटे मोती आहेत हे आपण सहज जाणाल. ते जर पक्के नसतील तर शक्तिपातयोगाच्या ज्ञानाग्निमध्ये भाजून त्यांचा जीव शिवरूप केला पाहिजे. अशा प्रकारे नामदेवांना ब्रह्मरूप केले पाहिजे. जमलेली सर्व संतमंडळी टाळचा वाजवीत ब्रह्मानंदाने डोलत होती. परंतु नामदेव मात्र कोरेच होते. त्यांना काही असा ब्रह्मानंद प्राप्त झाला नव्हता. वास्तविक निर्गुणापासूनच सगुणाची उत्पत्ती होते. परंतु नामदेव सगुणाच्या संगतीत रमून गेल्याने निर्गुण अशी स्वरूप-स्थिती त्यांच्या अंगी बाणली नाही. आपल्या खऱ्या स्वरूपाचा त्यांना यत्किंचितही बोध झाला नाही. मुक्ताबाई म्हणाली नामदेवाची स्थिती अशी असल्याने त्यांच्या बाबतीत ते हिरा आहेत का गार आहेत याची आपण उत्तम प्रकारे पारख केली पाहिजे.

**नामदेवाची परीक्षा :–** मुक्ताबाईने गोरोबांना नामदेवांची परीक्षा करण्यास सांगितल्यावर त्यांनी तेथे जमलेल्या सर्वांचीच पुढील प्रमाणे परीक्षा घेतली.

जव्हारियाचे पुढे मांडियेले रत्न । आतां मोला उणे येईल कैसें ।। १ ।। तैसें थापटणे पारखियाचा हात । वाफ झाल्या घात वाया जाती ।। २ ।। प्रथम थापटणे हाणिले निवृत्तीच्या माथा । डेरा झाला निका परब्रह्म ।। ३ ।। तेचि थापटणे ज्ञानेश्वरावर । आता कैंचे कोरे उरे येथे ।। ४ ।। तेंचि थापटणें सोपानाचे डोई । यात लेश नाही कोरे कोठे ।। ५ ।। तेचि थापटणे मुक्ताबाईला हाणी । अमृत संजीवनी उतो आली ।। ६ ।। तेंचि थापटणें नामदेवावर । डोई चोळं मोहरें रडो

लागे ।। ७ ।। गोरा म्हणे कोरा राहिला ग बाई । शून्यभर नाही भाजिले कोठे ।। ८ ।।

सूज्ञ जव्हेऱ्याच्यापुढे रत्न ठेवले असता त्याच्या किमतीमध्ये बदल होऊ शकत नाही. कारण तो त्याची खरी किंमत करतो. त्याच्याप्रमाणेच गोरोबांचा हात परीक्षा करणारा आहे. त्यांनी हाताने थापटून पाहिल्याबरोबर नामदेव कोरे आहेत का पक्के आहेत ते कळून येईल. त्यांच्या बाबतीत बाफ निघून गेल्या प्रमाणे थापटणे कधीही वाया जाणार नाही. कारण त्यांची परीक्षा बरोबर ठरणार आहे. गोरोबांनी प्रथम निवृत्तीरायांच्या डोक्यावर थापटले. त्यावेळी ते परब्रह्मस्वरूप झाल्याचे आढळून आले. त्यानंतर ज्ञानदेवरायांच्या डोक्यावर त्यांनी थापटले. तेथे कोरेपणा थोडासुद्धा शिल्लक नव्हता. सोपानरायांना थापटल्यावर त्यांच्यातही काही कोरेपणा नव्हता. मुक्ताबाईला थापटून पाहिले तेव्हां अमृतस्वरूप शक्ती संजीवनीच्या रूपाने उफाळून येत असल्याचे दिसले. ज्यावेळी त्यांनी नामदेवांच्या डोक्यावर थापटले तेव्हा ते डोके चोळू लागले. इतकेच नव्हे तर ते पुढे मोठ्याने रडू लागले. त्यावर गोरोबाकाका मुक्ताईला म्हणाले, " हे बाई ! हा तर कर-करीत कोरा राहिला आहे. हा कोणत्याही बाजूने थोडासुद्धा भाजला गेला नाही.

या प्रकारामुळे नामदेव मनातल्या मनात अगदी दुःखी झाले. त्यांना कोणी-कडून या संतमंडळीच्या भेटीला आलो असे झाले. त्यांच्या संगतीचा काही लाभ मिळण्याऐवजी तोटाच झाला. नामदेव कच्चे व कोरे ठरले. आपण ज्यांच्या भेटीला आलो ती मंडळी संत नसून कैकाडी व दुष्ट आहेत असे त्यांना वाटू लागले. याचे कारण अगदी स्पष्ट होते. आपला सत्कार करण्याऐवजी या संतमंडळींनी थापटणे मारून डोके फोडले असे त्यांच्या मनाने घेतले. मुक्ताबाई व इतरांनी अशारीतीने संभावना केल्याने त्यांच्या मनाला फार उद्विग्नता आली. या संतमंडळीत आपले कोणीही प्रिय नाही असे ते मोठमोठ्याने म्हणू लागले.

खरे पाहिले असता नामदेवांना वैराग्याच्या कसोटीचे घाव बिलकुल सहन झाले नाहीत. त्यामुळे आपण मागच्या मागे पळ काढावा असे त्यांना वाटू लागले. त्यांची पावले पंढरीकडे वळू लागली. मनामध्ये भयभीत झाल्याने त्यांच्या अंगातून घामाच्या धारा वाहू लागल्या. आता जर का आपण यांच्या सहवासात राहिलो तर हे लोक खरोखरच आपणाला ज्ञानाग्नीत भाजल्याशिवाय राहाणार नाहीत असे त्यांना पक्के वाटू लागले.

नामदेवांची ही उलघाल पाहिल्यावर मुक्ताई म्हणाली, " यांच्या चैतन्याच्या ठिकाणी जो अज्ञानाचा केर आलेला आहे तो शक्तिजागृतीने उत्पन्न होणाऱ्या ब्रह्मज्ञानाने जाळला पाहिजे. हे नामदेवाचे कच्चे मडके चांगले आतून बाहेरून भाजून काढून सर्व पोकळी भरून टाकू. यांच्या ठिकाणी असलेला जीवभाव दग्ध करून शिवभाव प्राप्त करून देऊ. असे झाले म्हणजे नामदेव पांडुरंगाला खऱ्या अर्थाने प्रिय होतील. "

मुक्ताबाईचे हे सगळे बोलणे ऐकून व तिचा अविर्भाव पाहून नामदेवांनी संतमंडळींचा निरोप न घेताच तेथून पाय काढता घेतला. ते थेट पंढरपूराला आले. पांडुरंगाच्या गळयास त्यांनी मिठी मारली. पुन्हा म्हणून निवृत्तीनाथ व मुक्ताबाई या सारख्या संतांच्या हातात मला स्वाधीन करू नका म्हणून त्यांनी पांडुरंगाला कळकळीने विनंती केली. ते पांडुरंगाला म्हणाले, " काही पूर्वसंचित होते म्हणून तुझी माझी आज भेट झाली. अन्यथा या लोकांनी मला तेथेच जीवानिशी जाळून भस्म केले असते. ही सर्व संत मंडळी अगदी कपटी आहेत. ते सर्व मला जाळण्याकरिता उत्सुक आहेत. त्यांना तुझी माझी भक्ती, प्रेम व आपलेपणा पाहवत नाही."

" हे देवराया ! आपली मी पूर्वकाळी काही सेवा केली ती या वेळेला फळाला आली. नाहीतर या संतांनी माझी जिवानिशी आहुती दिली असनी. अनंत जन्मामध्ये तुमच्या सेवेचे अनुष्ठान केले होते म्हणूनच पुन्हा या ठिकाणी मला आपल्या चरणांचे दर्शन घडले. एखाद्यावेळी ते माझ्या पाठोपाठ इकडे येतील की काय हे सांगता येत नाही. कदाचित् ते मला त्यांच्या हाती देण्यासाठी तुला भीडही घालण्याचा संभव आहे. तू उदार असल्याने मला त्यांच्या हाती अगदी आगत्याने देशील. त्यांच्या हातात देण्यापेक्षा तूच तुझ्या हाताने माझा जीव घेतलास तर मला अधिक बरे वाटेल. तुझ्यासाठी मी युगायुगी धरणे धेऊन बसलो आहे. तेव्हा आता मी तुझे चरण कदापीही सोडणार नाही.

नामदेवांचे हे बोलणे देवांना तितकेसे आवडले नाही. त्यांनी संतमंडळींची नामदेवांपुढे खूप स्तुती केली त्यामुळे नामदेवांना संताप आला. ते देवाला म्हणाले, " हे पांडुरंगा, तू या संतांचा अद्‌भुत लौकिक मला सांगू नकोस कारण यांच्या हातात नारळाची नरोटी आहे. जीर्ण कपडयांचा भार त्यांच्या अंगावर आहे. हेच लोक माझा उद्धार करतील म्हणून तू त्यांचे गोडवे गात आहेस. पण मला तुझ्या म्हणण्यात काही तथ्यांश दिसत नाही. भोपळयाची परळ हीच ज्यांच्या घरात संपत्ती आहे अशांची स्तुती व कौतुक तू का करीत आहेस हे काही कळत नाही. या संताची स्थिती राजासारखी आहे असा अद्‌भुत लौकिक जरी तू मला सांगत असलास तरी भिकाऱ्यांच्यापेक्षा जास्त मोठी किमत यांची खचितच नाही. मी जेव्हा त्यांच्या बरोबर बसलो होतो तेव्हा ते एकमेकात कैकाडयासारखे गुडगुड करीत आपापसात एकमेकाशी बोलत होते. मला तर त्यातील एक शब्द सुद्धा समजत नव्हता. दिव्य प्रकाशाच्या अनुभवासंबंधी जेव्हा त्यांचे बोलणे सुरू झाले तेव्हा ते मला अत्यंत भयानक वाटू लागले. कारण प्रकाशाच्या दिव्य अवस्थेत सर्व काही आटून जाते व तेथे देव-भक्त इत्यादि काही नाही असे ते म्हणत होते. मला हे त्यांचे बोलणे पसंत पडले नाही. "

" या संत मंडळींच्या जवळ वास्तविक एक छदाम कवडी सुद्धा खर्च

करण्याकरता नव्हती. परंतु आम्ही धान्याचें कोठार खरेदी केले आहे आहे ते खुशाल म्हणत होते. ते प्रेमाने उन्मत्त झाल्याने मधून मधून हसत होते. रडत होते. एकमेकांच्या अंगावर पडत होते. आमच्या आनंदाला पारावार नाही असे म्हणत बेभान होऊन धुंदपणे नाचत होते व वडबडतही होते. देवा! आपण त्या संतांच्या कोणत्या गुणांना पाहून प्रसन्न झाला हे काही समजत नाही. वास्तविक या संतांचा सगळा जन्म चिंध्या नेसण्यात गेला. असे असताना आपण त्यांची दरिद्रता पाहूत कासावीस होता हे नवल आहे. सगळ्यात आश्चर्याची गोष्ट अशी आहे की एखाद्याने बरबर पांढऱ्या दिसणाऱ्या वस्तूला परिस समजावे त्याप्रमाणे आपण या लोकांना संत समजता. परंतु ही आपली आपण शुद्ध फसवणूक करून घेत आहात. या चौघा बहीणभावांच्यामध्ये मुक्ताबाई तर इतकी चढेल आहे की तिने जाता जाता मोठ्या मोठ्या संताचा अपमान केला. मुक्ताबाईबरोबर सगळेच जण आम्ही अखिल ब्रह्मांड बगलेत मारू अशी वल्गना करीत होते. त्यामुळे हे सर्वजण पाखंडी असावेत अशी माझी ठाम समजूत झाली आहे."

"देवा! एखादी चांडाळचौकडी एक जमावी त्याप्रमाणे ही संतमंडळी एकत्र जमून धिंगाणा घालीत होती. त्यांच्या बोलण्यावरून सर्वांची बुद्धी भ्रष्ट झाली आहे असे मला वाटते. वास्तविक मी त्यांना प्रेमाने भेटावयास गेलो होतो. परंतु मी तेथे बसल्यावर त्यांनी माझी निर्भर्त्सना सुरू केली. त्यामुळे मी त्यांच्या तेथून निघून येथे परत आलो. माझ्या ठिकाणी अज्ञानाचा खूप केरकचरा आहे असे म्हणून तो ज्ञानाग्नीत जाळलाच पाहिजे असे जेव्हा त्यांनी ठरविले तेव्हाच या लोकांच्या मनातील आदरभाव दिसून आला. आलेल्या अथितीला आढ्यतेने वागविण्याची यांची विलक्षण पद्धती पाहून व आपण फार मोठे आहोत असे समजून दुसऱ्याला उपदेश देण्याची पद्धत पाहून मला त्यांची किळस वाटली. या निर्दय माणसांच्या भीतीनेच मी तुझ्याकडे आलो आहे. हे सर्व मी तुला सांगितले ते एवढ्यासाठी की तू मला जीवदान दिले पाहिजे. मला या संकटातून वाचविले पाहिजे. इतके सांगून नामदेवांनी देवाला अगदी काकुळतीने प्रार्थना केली की,

आहे त्यांचे मनीं करावें आगमन। घेतील मागून तुजपाशी ॥ १ ॥ तयेवेळी-व्हाल तुम्ही बेइमान। तुम्ही द्याल काढून संतापाशी ॥ २ ॥ खादल्या पिदल्याचे राखे वा स्मरण। तुला माझी आण पांडुरंगा ॥ ३ ॥ चालविला लळा पुरविली आवड। आतां कां दगड जड झालो ॥ ४ ॥ कां माझी चिंता सोडिली अनंता। संतालागी देता हरूप वाटे ॥ ५ ॥ नामा म्हणे काय करीसी अमंगळ। अडचणी राऊळामाजी झाली ॥ ६ ॥

देवाने आपल्याला संतांच्या हातात देऊ नये म्हणून नामदेव पुन:पुन्हा देवाला प्रार्थना करीत होते. संतांच्या हातात आपण सापडलो की आपल्या सर्व जीवनाची माती होईल अशी नामदेवांना भीती वाटत होती. त्यासाठी ते देवाला

म्हणाले. वटारोनी डोळे पाहती आभास। मज त्यांचा भास कळों नेदी ॥ १ ॥ भाजा भाजा म्हणोउनी उठली एकसरा। मग म्यां बाहेर गमन केलें॥ २ ॥ आतां आजतरी द्याल त्यांचे हाती। होऊं पाहती माती जीवित्वाची ॥ ३ ॥ अभयाचे दान द्यावे बा श्रीहरी। दुर्बल बाहेरी घालू नये ॥ ४ ॥ समर्था लांच्छन लागते नावाचे। न जाणो देवाचे असेल काही ॥ ५ ॥ नामा म्हणे नाव पतितपावन। ते या बोला उणे आणू नये ॥ ६ ॥ ही संताची चांडाळ चौकडी डोळे वटारून माझ्याकडे पाहात होती. ते माझ्याकडे अशा दुष्ट नजरेने का पाहात होते कोण जाणे? मला त्यांच्या या माझ्याकडे रोखून पाहाण्याचा अर्थंच कळला नाही. याला भाजा भाजा, अशी ओरड करीत ते सर्वजण एकदम उठले! त्यांची ही अघोर कृती पाहून मी बाहेर पडलो. अशा परिस्थितीत तुम्ही जर मला त्यांच्या हातात द्याल तर माझ्या सर्व जीवनाची माती होईल. आयुष्य फुकट जाईल. असे काही होऊ नये म्हणून मला तुम्ही अभयाचेच दान द्या. म्हणजे मी निश्चित होईन. आपण माझी कीव करा. मी दुर्बळ म्हणून मला बाहेर हाकलून देऊ नका. माझ्यावर दया करा. आपण माझ्या प्रार्थनेला मान देऊन माझे रक्षण करा म्हणजे आपल्या नावाला काळिमा लागणार नाही. समर्थांना आपल्या नावाची चाड असते ही गोष्ट आपण विसरू नका. आपला महिमा आगाध आहे. आपण काहीही करू शकाल. तेव्हा एवढे माझ्यासाठी कराच. पतितपावन अशी आपली बिरुदावळी आहे. तिला कमीपणा आणू नका. मी तुम्हाला शरण आहे.

**संतांचा महिमा**

अशा प्रकारे नामदेवांनी देवाची खूप प्रार्थना केली. परंतु नामदेवाला संतसंगतीचे व कृपेचे खरे मर्म कळत नसल्यामुळे तो भलतेच वडवडत आहे हे जाणून देवांनी त्याला सताचे माहात्म्य प्रथम सांगितले. ते म्हणाले, संतासी विन्मुख झाला जो गव्हार। नाहीं आतां थार इहपरलोकी ॥१॥ नाही घेतला वेडचा संताचा अंगवळा। झोप बैसली डोळा अज्ञानाची ॥२॥ भ्रांतीने तुझी पुरविली पाठीं। सज्जनाच्या गोष्टी कडू झाल्या ॥३॥ हातां आला लाभ गमविला सारा। भुललासी गव्हारा भ्रमभुलीं ॥४॥ मोहसर्पें तुझें व्यापियेलें अंग। म्हणे पांडुरंग काय आतां ॥५॥

देव म्हणाले, हे नामदेवा! संतांचा महिमा अगाध आहे. जो संतांकडे जात नाही त्यांची संगती करीत नाही व त्यांच्याकडे पाठ फिरवितो त्याला इहलोकी व परलोकी थारा नसतो. संतांच्या सहवासाचे सामर्थ्य अपार आहे. तुझ्या डोळयावर अज्ञानाची झापड आल्यामुळे तू काही तरीच बोलत आहेस. भ्रांतीने तुझा पाठपुरवा केला आहे. त्यामुळे सज्जनांचा अमृततुल्य उपदेश तुला कडू वाटतो. संतांच्या कृपेमुळे तुझी अंतरिक शक्ती जेव्हा जागृत होईल तेव्हा तुझे सर्व अज्ञान दूर होऊन आत्मस्वरूपाचा लाभ होईल. असा अमूल्य लाभ तुला मिळत होता. पण तू तो गमावीत आहेस. भ्रमामुळे तुझे अंत:करण मोहित झाल्याने भुलीची झापड पडून

खरे मर्म कळणे तुला कठीण झाले आहे. तुझे सर्व अंत:कारण मोहरूपी सर्पाने व्याप्त झाले आहे. गुरुकृपेशिवाय दुसरा मार्गच नाही. एवढे सांगून देवाने नामदेवांना तू गुरु करून उपदेश घेतला पाहिजे असे परोपरी सांगितले.

देव म्हणाले, हे नामदेवा ! माझी तुला आज्ञा आहे की तू अत्यंत नम्रता धारण करून अतिशय हीनदीन होऊन श्रीगुरूस शरण जा. अशा प्रकारे तू शरण गेलास म्हणजे ते शक्तिपात करून कृपा करतील. अशा प्रकारची श्रीगुरुरायाची लवमात्र कृपा झाली तरी जिकडे तिकडे माझ्या स्वरुपाच्या प्रकाशाचा तुला प्रत्यय येईल. मग तुझ्या माझ्यामध्ये जो भेदाचा भास प्रतीत होतो तो सहज नष्ट होईल."

देवाचे हे म्हणणे ऐकून नामदेव मध्येच म्हणाला, देवा ! तुमचा मला प्रत्यक्ष लाभ झाला आहे. अशावेळी तुमची प्राप्ती व्हावी म्हणून सद्गुरूला शरण जाण्यासंबंधी जी आज्ञा देत आहात ती पाहून मला विलक्षण आश्चर्य वाटते आहे. खरोखर तुझा लाभ झाल्यावर सद्गुरूची काहीही आवश्यकता नाही. झाडावर असलेले फळ मिळावे म्हणून झाडावर चढणे अगत्याचे आहे. परंतु ते फळ जर सहजासहजी हाताला आले तर झाडावर चढण्याची जरुरीच काय आहे ?

त्यावर देव म्हणाले, अरे नाम्या ! तू अज्ञानामुळे हे बोलत आहेस. ते अज्ञान टाकून देऊन सद्गुरु चरणांकित हो. माझी प्राप्ती झाली आहे असे जे तुला वाटत आहे ते सर्व खोटे आहे. तुझ्यावरील प्रेमामुळे मायेने अनेक प्रकारची सोंगे घेऊन मी हा खोटा खेळ तुझ्याशी खेळत आहे. जोपर्यंत तू सद्गुरूला शरण जात नाहीस, तुझ्या हातून त्यांची सेवा घडत नाही व त्यांची कृपाशक्ती तुझ्या ठिकाणी संचारित होत नाही तोपर्यंत माझी सध्याची तुला जी प्राप्ती झाली आहे असे वाटते ती केवळ स्वप्नातील धनासारखी आहे. माझ्या अशा मायावी मूर्तीच्या दर्शनाने तुझे भवबंधन कदापीही तुटणार नाही. माझ्या या आज्ञेत कालत्रयीही बदल होणार नाही.

देवाच्या या प्रेमपूर्ण आज्ञेने नामदेव सद्गदित झाले. त्यांचे मन अगदी सुन्न होऊन गेले. संताबद्दल आपले विचार व मते काहीही असली तरी देव ज्या कळवळयाने आज्ञा करीत आहेत ती आपल्या हिताचीच असणार आहे हे त्यांनी जाणले. मनातून जरी सद्गुरु करण्याची इच्छा नसली तरी देवाची आज्ञा मानली पाहिजे असे त्यांना वाटू लागले. त्यांच्यापुढे दुसरा कुठलाही पर्याय उरला नाही. त्यांचे अंत:करण विरघळून गेले त्यांनी विठोबाच्या चरणावर मस्तक ठेवले. नामदेवांचे मन थोडे निवांत झाले. त्यांनी देवाला विचारले मी कोणत्या गुरूला शरण जाऊ ? कोणाची दीक्षा घेऊ ? देव म्हाणाले, नाम्या तुझ्या या प्रश्नामुळे मला जो आनंद झाला आहे त्याचे वर्णन मी करू शकत नाही. तू गुरूला शरण जाणार हे ऐकून माझे कान अगदी तृप्त झाले आहेत. प्रथम मी तुला गुरूची माहिती सांगतो. त्यांच्या गुणांची माहिती देतो. असे गुरु कोठे आहेत व त्यांचे नाव काय तेही सांगतो. ही सर्व माहिती मिळाल्यावर तू अगदी नि:शंक मनाने सद्गुरूला शरण जा. देव म्हणाले,

कृपायुक्त अशा गुरूची मी माहिती सांगतो ती तू एकाग्र चित्ताने ऐक.

जे खरे गुरू असतात त्यांना आपण गुरू व्हावे अशी यत्किंचितही अपेक्षा नसते. शिष्यांनी त्यांची सेवा केली तर त्यांना लाज वाटते. ते सहज उदास वृत्तीचे असतात. त्यांचा भाव शुद्ध व भोळा असतो. निंदा किंवा स्तुती त्यांना समान वाटते. मर्मभेदक अशा तीक्ष्ण शब्दांनी त्यांच्यावर कोणी प्रहार केला तरी त्यांना कोणासंबंधी केव्हाही क्रोध उत्पन्न होत नाही. त्यांच्या ठिकाणी खऱ्याखोटयाची गंधवार्ताही असत नाही. त्यांना लहानमोठे सारखे वाटतात. सुखदुःखाचे आघात त्यांच्या चित्ताला स्पर्श करू शकत नाहीत. शिष्यांनी कदाचित आळस केला तर त्याकडे ते दुर्लक्ष करतात. आपले सर्वस्व ते शिष्याला देतात. कोणत्याही प्रकारे त्यांच्या ठिकाणी मोठेपणाचे महत्त्व नसते. सज्जन मनुष्य पाहिला की त्यांना आनंद होतो. त्याच्या गुणावगुणांचा ते विचार करीत नाहीत. साधु-संगती आपल्याला घडावी अशी त्यांना अंतःकरणापासून इच्छा असते. ते परब्रह्म स्वरूप होऊन राहतात. त्यांचे अंतःकरण परब्रह्मात विरघळून गेलेले असते. त्यामुळे त्यांची समदृष्टी झालेली असते. जे आत बाहेर पूर्ण भरून शेष राहिले आहे त्या स्वरूपानंदाच्या योगाने त्यांचे अंतःकरण तृप्त होऊन शांत झालेले असते. जणू काही ते परब्रह्माच्या स्वरूपाने मढविलेले आहेत असे वाटते. ते परब्रह्माशी एकरूप झालेले असतात. असे हे साधूचे माहात्म्य आहे. अशा या संतपदाची स्थिती आत्मसात करीत असता तेथे मनपणाचा भाव कसा राहील? संतमाहात्म्यांचे वर्णन कल्पचेकल्प करीत राहिले तरी त्याची पूर्तता होणार नाही. हे नाम्या ! अशा थोर सद्गुरूची जेव्हा तुला प्राप्ती होईल तेव्हा ते तुला कृपापात्र समजून दयार्द्र अंतःकरणाने शक्तिपात दीक्षा देतील. त्यावेळी तुझ्या अंतःकरणातील सर्व संशय नष्ट होऊन तुला मत्स्वरूप प्राप्त होऊन तू माझ्याशी एकरूप होऊन जाशील.

देवाचे हे सद्गुरु माहात्म्य नामदेवांच्या अंतःकरणात चांगले रुजले. त्यांनी विचारले देवा ! आपल्या महत्कृपेने अशा कृपानिधी सद्गुरूची भेट झाल्यावर त्यांची सेवा मी कशी करू तेही मला सांगा.

देव म्हणाले, सद्गुरूची सेवा करताना द्वैत बुद्धीचा त्याग करावा. तनमन धनादि सर्वस्व अर्पण करावे. मनातील भाव अत्यंत शुद्ध ठेवावा. सेवा करताना तर्कवितर्क व बाह्य मुद्रादिक साधनांना काहीही किंमत नसते. कारण या साधनांच्या जोरावर सद्गुरूंना आपलेसे करता येत नाही. यासाठी त्यांना अत्यंत नम्रपणे शरण जावे व भवसागरातून मला तारून न्या अशी त्यांची दीनपणे प्रार्थना करावी. सर्वभावे त्यांना भजावे.

सद्गुरू अंतर्बाह्य भरून राहिलेल्या व्यापक स्वरूपाशी समरस झालेले असल्याने ते जगातील लीला-कौतुक आनंदाने पाहातात. ज्यांचा जसा अधिकार असेल त्यांना त्याप्रमाणे ते उपदेश करतात. भाग्यवशात अशा थोर संतांची भेट झाली

तरी त्यांच्याशी वर्तणूक करणे महाकठीण आहे. त्यातील गुह्य मी तुला सांगतो. तू ते सावधान चित्ताने ऐक. शरीराचा त्याग करण्याचा प्रसंग आला असताही त्यांच्या आज्ञेचे उल्लंघन होऊ नये. रात्रंदिवस त्यांच्या आज्ञेत राहावे. ज्या ज्या व्यक्तींवर गुरूचे आत्यंतिक प्रेम असेल त्या त्या व्यक्तींची अनन्य भावे भक्ती करावी. काय वाटेल ते झाले तरी केव्हाही कोणाही व्यक्तीला विरोध करू नये. कारण सद्‌गुरूराय हे सर्व व्यापक असल्याने त्यांना कोणताही वैरभाव सहन होत नाही. या तत्त्वाकरिता कोणत्याही प्रकारची आपत्ती सोसावी लागली तरी ती सहन करून व सद्‌गुरू महाराज सर्व ठीक करण्यास समर्थ आहेत हे सतत लक्षात ठेवून कधीही खेद करू नये. कोणाशीही विरोधी भाव शिष्याने धारण केला तर त्याचा दोष सद्‌गुरूंना लागतो. भांडे फुटले म्हणजे अमृत जमिनीवर सांडून जाते. त्याचप्रमाणेच शिष्याच्या विरोधी भावाने त्याच्या खऱ्या भावामृताची हानी होते. ज्याच्यावर सदुगुरूंनी कृपा केली आहे त्यांना भगवत्स्वरूप मानले पाहिजे. जरी सर्व नष्ट होण्याचा प्रसंग आला तरी सद्‌गुरूंना प्रिय असणाऱ्या व्यक्तींना अंतर देऊ नये. कारण या व्यक्तींच्या हृदयात सद्‌गुरू निरंतर राहात असल्याने त्यांच्या अंत:करणाला क्लेश होतील असे वर्तन घडले तर सद्‌गुरुंचा अंतराय होईल. अंत:करणात क्रोध उत्पन्न झाला की आत्मस्थितीत अंतर पडते. चित्त चंचल होते. ह्या दोष गुरूला लागत असल्याने शिष्याच्या हातून गुरूचा घात केल्यासारखे होते. आपल्या गुरूचे जे जे शिष्य आहेत ते सर्व आपले बंधू आहेत असे समजून त्यांच्याशी प्रेमाचे वर्तन ठेवावे. त्यांचा स्वप्नातही मत्सर करू नये. गुरुबंधूंचा मत्सर म्हणजे गुरूचा वध होय असे शास्त्र वचन आहे. तेव्हा प्रसंगावधान सांभाळून त्यांच्याशी वागणूक ठेवावी. कदाचित् एखाद्याला क्रोध निर्माण झाला तर दुसऱ्यांनी त्यांचे समाधान करावे. जे कोणी आपल्या गुरूची स्तुती करतील त्यांचे पाय आपल्या मस्तकावर धारण करावेत. कोणी आपल्या गुरूची निंदा करू लागला तर तेथून त्वरित निघून जावे. गुरूच्या आसनावर बसू नये. गुरूशी विशेष भाषण करू नये. त्यांना नमस्कार करून त्यांच्या आज्ञेने कोणत्याही विशेष कार्याचा आरंभ करावा. ज्या दिशेकडे गुरूचे वास्तव्य आहे त्या दिशेला नमस्कार करावा. चकोर ज्याप्रमाणे चंद्राच्या भेटीकरता उत्सक असतो त्याप्रमाणे श्रीगुरूच्या भेटीविषयी नेहमी उत्सक असावे. आपले तन,मन,चित्त,धनादिक सर्व गुरूला अर्पण करून शेवटी जीवभाव गुरूरूप चैतन्याला अर्पण करून श्रीगुरुच्या सत्‌चिदानंद स्वरूपाशी एकरूप होऊन जावे. गुरूरायाच्या दोषासंबंधी केव्हाही उच्चार करू नये. मेरू पर्वत अचल असल्यामुळे ज्याप्रमाणे त्याच्यात बदल होऊ शकत नाही त्याप्रमाणे गुरूच्या वचनाचा स्वीकार करावा. अखिल विश्व हे गुरूसमान पाहावे. आपल्याला अत्यंत प्रिय असलेली व त्यांना आवडणारी वस्तू त्यांच्या चित्ताला संतोष होईल असे पाहून अर्पण करावी. सद्‌गुरूराय हे ज्यांच्या वागण्यामुळे क्रुद्ध होतात ती साव

असला तरी गाढव समजावा. अशांना ईश्वर सहाय्यकर्ता झाला तरी तो मुक्त होऊ शकत नाही.

हे नाम्या ! सर्व देव पितर व मानव सद्गुरूच्या आधीन असतात. त्यामुळे एका सद्गुरूची पूजा केली की ती सर्वांना मिळून सर्व आनंदित होतात. असा हा सद्गुरूचा महिमा अत्यंत मोठा असल्याने ब्रह्म त्यांच्या आधीन असते. सद्गुरू हे ब्रह्मस्वरूप झालेले असतात. अशा सद्गुरूरायाने एखाद्या पतिताचा अंगिकार केला असता तो ब्रह्मरूप होतो. अशी वर्तणूक आपल्याकडून घडेल अशी ज्यांना खात्री असेल त्यांनीच सद्गुरूरायांना शरण जावे. अशी शरणागती पत्करल्याशिवाय कृपाशक्तीचे संक्रमण होऊ शकत नाही. ह्या शक्तिसंचारामुळेच जीव जन्ममरण परंपरेतून मुक्त होतो. अन्यथा कशानेही होत नाही. अशाप्रकारे वागण्याची शक्ती ज्याच्याजवळ नसेल त्याने आनंदाने माझे नामस्मरण करावे. परंतु हा खात्रीलायक उपाय नाही कारण अशा माझ्या नामजपानुष्ठानाने कदाचित् तो जन्ममृत्यूच्या परंपरेतून मुक्त होऊ शकेल. अशी ही नामस्मरणयुक्त भक्ती करता करता कोणत्या तरी जन्मी त्याला सद्गुरूचा लाभ घडेल. जे लोक बाह्यात्कारी केवळ चढाओढीने गुरू करतात त्यांच्या सद्बुद्धीचा नाश होतो. त्यामुळे ते यमाच्या हाती पडून त्यांना रौरव नरक प्राप्त होतो.

गुरुसेवा म्हणजे मोक्षपद होय. गुरुसेवा म्हणजे आनंपद होय. इतकेच नव्हे तर गुरुसेवा म्हणजे कैवल्यप्राप्ती करुन देणारा असा ब्रह्मबोधच होय. अशाप्रकारे जो सदगुरूचे वचन शिरसावंद्य मानतो तोच ब्रह्मविद्येचा अधिकारी होऊन हरीहरांना पूज्य होतो. अशा रीतीने श्रीहरीने मोठ्या प्रेमाने नामदेवरायांना शिष्यांनी गुरूशी कसे वागावे व कोणत्या प्रकारे वर्तन करावे याचे हर्षभरित वर्णन केले. या वर्णनामुळे नामदेवांचे अंत:करण अगदी सद्गदित झाले. त्यांचे डोळे पाण्याने भरले. त्या अवस्थेतच त्यांनी देवाच्या पायावर लोळण घेतली व देवाची कळवळून प्रार्थना केली की– 'हे देवराया ! तू माझ्यासाठी मशालधारी हो ! गुरुरूपी धन माझ्या नेत्रांना दाखव. त्यामुळे माझ्या भवबंधनाच्या गाठी तुटून जातील व मी कृतकृत्य होईन."

नामदेवरायांनी देवाला आत्यंतिक प्रेमाने केलेल्या ह्या प्रार्थनेमुळे देवरायांना त्याचा कळवळा आला. अंत:कारणात त्यांच्या विषयी प्रेम दाटून आले. त्यावेळी नामदेवास पोटाशी धरून देव म्हणाले, नाम्या ! घाबरू नकोस. तू विसोबा खेचराकडे जा. त्यांच्या पायावर मस्तक ठेऊन त्यांना सर्वस्व अर्पण कर. यामुळे ते संतुष्ट होऊन आपला कृपाहस्त तुझ्या मस्तकावर ठेवतील. त्यांच्या हस्तस्पर्शाने दिव्य शक्तीचे संक्रमण घडून येऊन तुझे सर्व दोष जळून जातील व तू मुक्त होशील.

देवाने आपल्याला खऱ्या सद्गुरूचा ठावठिकाणा सांगितला हे पाहून नामदेवांना समाधान झाले. नामदेवांनी आपले [illegible] सद्गुरूस [illegible] आण्यास

तो तयार झाला हे पाहून देवानांही आनंद झाला. देवांनी नामदेवास आशीर्वाद दिला. ते म्हणाले, हे नामया ! सद्‌गुरुकृपाप्राप्तीमुळे तुला ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन तू माझ्या स्वरूपी समरस होशील. "

श्रीपांडुरंगांनी नामदेवास श्रीविसोबा खेचरांना शरण जाण्यास सांगितले. कारण सद्‌गुरूला शरण गेल्याशिवाय त्यांच्या मनात शिष्याविषयीं करुणा उत्पन्न होत नाही. शिष्य सद्‌गुरूला शरण गेला की, याचा जीवभाव नाहीसा होऊन याला ब्रह्मभाव प्राप्त व्हावा असा सद्‌गुरूचा ठिकाणीं जो संकल्प उत्पन्न होतो तो शिष्याच्या ठिकाणी संक्रमित होतो. त्यामुळे शक्ती जागृत होऊन चैतन्याने धारण केलेल्या जीवभावाची पुटे हळूहळू गळून पडतात व शुद्ध आत्मस्वरूप शिल्लक राहाते. हे एका सद्‌रूच्या परमकारुणिक कृपेशिवाय कालत्रयीही शक्य नाही हे नितांत सत्य आहे. देव आणि नामदेव भीमेच्या तीरावर उभे असताना हाच संवाद दोघांमध्ये घडून आला.

देव आणि नामा उभे भिमातीरा । प्रेमे येरयेरा आळविती ॥ १ ॥ देव म्हणे नाम्या ऐक गुह्य गोष्टी । संसाराची तुटी जेणें होय ॥ २ ॥ श्रीगुरुवाचोनि मुक्ती तुज नाही । भवनदीडोहीं नुतरसी ॥ ३ ॥ शरण गुरूसीं झालिया सप्रेमें । संसाराचा श्रम उतरूनी ॥४॥ गुरु वाचोनिया कैचा मुक्तिठाव । संसार हा वाव कैसा होय ॥ ५ ॥ म्हणूनि नाम्या तुंवा गुरूसी जावे शरण । तेणे भवबंधनें मुक्त होती ॥ ६ ॥ ऐसे ऐकोनिया नामा थरारिला । मूर्च्छागत झाला भूमिवरी ॥ ७ ॥ भूमी लोळे नामा कंठ सद्‌गदित । डोळीया स्त्रवत अश्रु जळ ॥ ८ ॥ इतके देखोनिया द्रवला पुरुपोत्तम नाम्यासी सप्रेमें उचलिले ॥ ९ ॥ नाम्या तुज काय वाटतसे दुःख । संसाराचे सुखदुःख तुज झाले ॥ १० ॥ नामा म्हणे देवा तुज ऐसा दाता । मज भवव्यथा कवणे परी ॥ ११ ॥

जीविताचे सार व साधनाचे अंतिम ध्येय असलेला पांडुरंगच आपल्याला भेटला असताना तोच आपल्याला श्रीगुरूला शरण जाण्यास सांगतो हे पाहून नामदेवांचा जीव अगदी गलबलून गेला. देवाने त्याच्या खऱ्या स्वरूपाच्या प्राप्तीसाठी सद्‌गुरूला शरण जाण्यास सांगितले याचे नामदेवांना फार वाईट वाटले. ते म्हणतात.

अनाथांचा नाथ तुझी ब्रीदावळी । मज का रे जाळी भवव्यथा ॥ १ ॥ देव म्हणे नाम्या गुरुवांचूनिया । मुक्ति पावावया आन नाहीं ॥ २ ॥ आन नेणें काहीं करिसी विपित्ती । नव्हे माझी प्राप्ती गुरूवीण ॥ ३ ॥ जाई नाम्या जाई गुरुसी शरण । तुटे भवबंधन तुझें वेगी ॥ ४ ॥ नामा म्हणे देवा कवणा शरण जाऊं । कोणा मी होऊं शरणागत ॥ ५ ॥ देव म्हणे नाम्या विसोबा खेचरासी । शरण तयासी जावें वेगीं ॥ ६ ॥

**श्रीसंत विसोबा खेचरांची नामदेवावर कृपा :**— येथून पुढे श्रीसंत विसोबा खेचरांनी नामदेवांवर कृपा केली म्हणजे [illegible] काय केले हे पहावयाचे आहे.

देवाच्या आज्ञेप्रमाणे नामदेवांनी विसोवा खेचरांना शरण जाण्याचा निश्चय केला. त्यांनी देवरायाच्या पायावर मस्तक ठेवले व तेथून ते स्वामी विसोबा खेचर यांच्या दर्शनार्थ निघाले. मनामध्ये नामदेव अत्यंत चिताग्रस्त झाले होते. अशा स्थितीतच ते आंवढचा नागनाथाला आले. गावात शिरताच त्यांना समोर एक शंकराचे देऊळ दिसले. त्या देवळात नामदेवरायांनी प्रवेश केला. त्यांनी महादेवाला नमस्कार केला तेव्हा एक अद्‌भुत आश्चर्य त्यांच्या दृष्टीस पडले.

कोणी तरी एक वृद्ध गृहस्थ पिंडीवर पाय ठेवून अगदी निवांतपणे डोळे मिटून स्वस्थ पडला होता. ही त्याची स्थिती पाहून नामदेवांना फार आश्चर्य वाटले. हा कोणी तरी विलक्षण प्राणी दिसतो असे ते मनाशी म्हणाले. नामदेवांनी त्या वृद्ध गृहस्थाला हलवून जागे केले आणि त्याला म्हणाले, 'अहो महाराज ! आपण वरकरणी तर फार चांगले दिसता. परंतु तुमची कृती काही माझ्या लक्षात येत नाही. आपण महादेवाच्या लिंगावर पाय ठेवून खुशाल निद्रा घेत आहात. तेव्हा कृपा करून आपले पाय दूर करा !

विसोवा खेचरांनी नामदेवाचे हे बोलणे ऐकले व ते शांतपणे म्हणाले. ' तू फार चांगला माणूस दिसतोस पण तू मला उगीच जाग आणलीस. मी कसा स्वस्थ आनंदात पडलो होतो. पण काही हरकत नाही. जेथे देव नाही अशी जागा शोधून काढून तेथे तू माझे पाय ठेव. ही गोष्ट करण्यात जर तू सफल झालास तर तुला मी सर्वज्ञ व भाग्यवान समजेन. मी स्वतः अहंकारामुळे मोहित झालो आहे. त्यामुळे सारासार विचार वगैरे मला काहीच समजत नाही. याकरिता ज्याठिकाणी तुझा देव नसेल त्याठिकाणी माझा पाय उचलून तू खुशाल ठेव.

विसोवा खेचरांचे बोलणे ऐकून नामदेव चकित झाले. या शब्दात मोठे गुह्य भरलेले असून ते अत्यंत मार्मिक आहेत याची त्यांना जाणीव झाली. त्या असाधारण शब्दांनी नामदेवांच्या मनाचा वेध केला. देवाशिवाय मोकळी जागा या तीन शब्दांनी त्यांचे अंतर्जगत व्यापून गेले. अशी देवाशिवाय मोकळी जागा असणे कसे शक्य आहे ! अगदी अशक्य कोटीतील गोष्ट ! या अशक्य वाटणाऱ्या गोष्टीबद्दल नामदेवांना पुन:पुन्हा संशय येत होता व त्यांचे मन व्याकूळ होत होते. देवाशिवाय मोकळी जागा हे कोडे आपल्याला सुटणे शक्य नाही अशी जाणीव झाल्यावर नामदेव विसोवा खेचरांना म्हणाले, ' आपण मला घातलेले कोडे आपणच सोडवून दाखवावे व मला या भवसागरातून मुक्त करावे अशी आपल्या चरणी प्रार्थना आहे. आपल्यासारखा अगाध ज्ञानी या त्रिभुवनात कोणी नाही. असे म्हणून नामदेवांनी विसोवांचे चरण घट्ट धरले व ते म्हणाले हे प्रभो ! आपल्याला लोक कोणत्या नावाने संबोधितात ? विसोवांनी उत्तर दिले की लौकिकामध्ये लोक मला विसा खेचर म्हणतात. हे नामदेवा या लौकिक गोष्टींची चर्चा निरुपयोगी आहे. मी तुला माझ्या जीविताचे गुज सांगतो ते देहाचे कान करून ऐक.

विसोबा खेचर म्हणाले, ज्याला नामरूप नाही तोच खरा देव होय. याहून भिन्न सर्व मिथ्या आहे. हा अनाम व अरूप देव जळीस्थळीकाष्ठीपाषाणी तर आहेच पण तो अणूरेणूत व सर्व पिंड ब्रह्मांडामध्ये व्यापून राहिला आहे. हे नाम्या ! परमात्मा सर्वत्र आणि सर्वसाक्षीभूत आहे. ज्यावेळी ही अनुभूती तुला येईल त्यावेळी तुला खरा देव दिसेल. तू नुसता तीळ आणि तुळशी घेऊन काय बसलास ? तुझी ही कृती अगदी निरुपयोगी आहे. वास्तविक वस्तू म्हणजे ब्रह्म स्वयंसिद्ध आहे. परंतु याची जाणीव नसल्याने व अनुभूती प्राप्त न झाल्याने तू व्यर्थ भुकेने मरत आहेस. जोपर्यंत खरा सद्‌गुरु तुला प्राप्त होत नाही तोपर्यंत हा केशवराजा तुला कधीही प्राप्त होणार नाही. ज्यावेळी सद्‌गुरु शक्तिपातयुक्त कृपा करतात त्यावेळी भेदबुद्धी नाहीशी होऊन अहंकार नष्ट होतो. इतकेच नव्हेतर ज्या ठिकाणी ओंकार मुरला जातो ती ब्रह्मरूपता अगदी सहज उपलब्ध होते. "

आता तुझ्या ध्यानात येईल की तू जे म्हणत होतास की देवाशी मी बोलतो, देव माझ्याशी खेळतो, हसतो, प्रेमालाप करतो, भांडतो ते सर्व अगदी असत्य आहे. जोपर्यंत मी व माझे ही बंधने नष्ट होणार नाहीत तोपर्यंत आत्माराम कसा भेटू शकेल ?

विसोबा खेचरांचे हे भाषण ऐकून नामदेवांचे मन आत्मारामाच्या भेटीसाठी उत्सुक झाले. त्या परमानुभूतीसाठी त्यांनी सद्‌गुरूंची अनन्य प्रार्थना केली. नामदेवांच्या प्रार्थनेने सद्‌गुरु विसोबा खेचर परम संतुष्ट झाले. त्यांना प्रेमाचा उमाळा आला. हे प्रेम नामदेवांच्या ठिकाणी संक्रांत करण्यासाठी आपला हात त्यांनी त्यांच्या मस्तकावर ठेवला. विसोबांचा हात नामदेवांच्या मस्तकावर पडताक्षणीच दिव्य प्रेम, भक्ती, ज्ञान, अनुभूती, या सर्व कलांनी युक्त असलेली शक्ती नामदेवांच्या ठिकाणी संक्रमित होऊन नामदेव आत्मरूप झाले. सर्व साधनांचे सार त्यांना शक्तिपातामुळे एका क्षणात प्राप्त झाले. इतर साधनांची मिरासदारी संपून गेली. नामदेव संतुष्ट झाले. धन्य झाले. कृतार्थ झाले.

पुढील दोन अभंगात नामदेवांनी आपल्याला ही स्थिती कशी प्राप्त झाली याचे बहारदार वर्णन केले आहे.

श्रवणीं सांगितली मात मस्तकी ठेवियेला हात । पदपिंडा विवर्जित केला नामा ।। १ ।। खेचरू विसा प्रेमाचा पिसा । तेणें नामा कैसा उपदेशिला ।। २ ।। सांगितले गुज दाखविले निज । आता पाल्हाळी तुज काय चाड ।। ३ ।। खेचरू म्हणे मज ज्ञानराज हेचि गुरु । तेणे अगोचर केला नामा ।। ४ ।।

विसोबा खेचरांनी प्रथम नामदेवांच्या कानामध्ये तत्त्वमसी म्हणजे ते ब्रह्म तूच आहेस या महावाक्याचा उपदेश केला. या उपदेशाची अनुभूती नामदेवांना यावी म्हणून त्यांच्या डोक्यावर हात ठेवून शक्तिसंक्रमण करून शक्तिपातदीक्षा दिली. पद म्हणजे अहं व पिंड म्हणजे जीव. आपल्या कृपाशक्तीच्या संक्रमणाने

विसोबांनी नामदेवाचा जीवभाव व ब्रह्मभाव हे दोन्ही घालवून त्यांना केवळ ब्रह्मस्वरूप करून टाकले. त्यांना विदेहस्थिती प्राप्त करून देऊन कैवल्यपदावर बसविले. नामदेवांना दीक्षा देत असताना विसोबा खेचर प्रेमाने अगदी धुंद झाले होते. या अद्‌भुत अवस्थेतच शक्तीचे संक्रमण नामदेवांच्या ठिकाणी घडून आले. परंपरेने प्राप्त झालेल्या ज्ञानाचे दान अशाप्रकारे विसोबांनी केले. त्यांनी नामदेवांना प्रथम गुह्य ज्ञान सांगितले व नंतर शक्तिपातयोगाच्या प्रभावाने निजस्वरूपाचा प्रत्ययही आणून दिला. इतकेच नव्हे तर विसोबांनी नामदेवांना आग्रहाने असे सांगितले की तूला अन्य साधनांच्या खटपटीची काहीही अवश्यकता नाही. हे शक्तिपातयोगाचे एकमात्र साधन तुला पुरेसे आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज हेच माझे गुरु आहेत. त्यांनीच हे साधन परमकृपेने मला देऊन अतींद्रिय अवस्था मला प्राप्त करून दिली. त्यामुळे मी कृतार्थ व धन्य झालो.

ही दीक्षा प्राप्त झाल्याने नामदेवांना खरी भक्ती प्राप्त झाली. दिव्य चक्षूंचे उन्मीलन झाले. प्रेमोन्माद प्राप्त झाला. त्या आनंदात त्यांनी सद्‌गुरूच्या पायी मिठीच घातली. इतके देखोनियां चरणीं घाली मिठी। सांठवला सृष्टी अवघा देव ।।१।। तिहीं त्रिभुवनीं आपण व्यापुनी। आनंदे कोंदोनी राहियेला ।। २ ।। श्रीगुरूचे पाय जीवें न विसंवत। मनोवृत्तिसहित ओंवाळिलें ।। ३ ।। डोळीयांचे डोळे उघडिले जेणें। आनंदाचे लेणें लेवविलें ।।४।। जन्ममरणाचे तोडीले सांकडे। कैवल्यची पुढे दावीयेलें ।। ५ ।। कैवल्याचा गाभा विटेवरी उभा। दिसे दिव्य शोभा पांडुरंग ।। ६ ।। नामा म्हणे माझी भक्ति हे माउली। कृपेची साउली केली मज ।। ७ ।।

(३) **नामदेवांना आलेले अनुभवः**– सद्‌गुरु श्रीविसोबा खेचरराय यांनी नामदेवांवर शक्तिपातयोगानुग्रह केल्यावर त्यांना जे अनुभव आले व त्यांची जी स्थिती झाली ती आता पाहावयाची आहे. नामदेवांनी स्वतःच या स्थितीचे व अनुभवांचे वर्णन केले आहे.

**मृत्युरहित स्थितीची प्राप्तीः**– नामदेवांना गुरुकृपेमुळे अमरत्व प्राप्त झाले. मरण हा शब्दच त्यांच्या दृष्टीने नाहिसा झाला. मृत्युरहित अशी आत्मस्वरुपस्थिती त्यांना प्राप्त झाली. या अनुभूतीचे वर्णन करताना नामदेव म्हणातात.

मरण सांगा स्वामी कवणीया गुणे। संसारी मरण उरले नाहीं ।।१।। आम्हा मरण नाही मेले होते काई। श्रीगुरुच्या पायीं राहे मना ।।२।। मरणें हे काया मरणें हे माया। मरे हे छाया कवण्या गुणें ।।३।। भक्ति अमरकंदू रामनाम वंदू। नामयासी छंदू विठोबाचा ।।४।।

**सर्वांभूती विठ्ठल अशी साम्यदृष्टीः**– विठ्ठल सर्वत्र भरुन राहिला आहे अशी समदृष्टी गुरुकृपेनंतर नामदेवांच्या अंतःकरणात बाणून गेली. ब्रह्मापासून स्तंभापर्यंत एक चैतन्यच वास करीत असून दुसरी गोष्टच अस्तित्वात नाही अशी अपूर्व साम्य-दृष्टी नामदेवांना प्राप्त झाली या अनुभवाचे वर्णन करताना नामदेव म्हणतात :–

नामा स्वयंपाक करोनि बैसला । केशव श्वानरुपें आला । रोटी घेऊन पळाला । सर्वाभूतीं केशव ॥१॥ हातीं घेऊन तुपाची वाटी । नामा लागला श्वानापाठीं । तूप घे जगजेठी । कोरडी रोटी कां खाशी ॥२॥ तव श्वान हांसोनी बोलिले । नामया तुज कैसे कळलें । येरू म्हणें खेचर उपदेशिलें । सर्वाभूतीं विठ्ठल ॥३॥

**दिव्य प्रेमाचो प्राप्ती** —— सद्‌गुरूंनी पूर्ण कृपा म्हणजे शक्तिपात केल्याने दिव्य प्रेमाचा उदय नामदेवांच्या ठिकाणी होऊन खरे सुख त्यांना मिळाले व निजवस्तूची प्राप्ती झाली.

सद्‌गुरुनायके पूर्ण कृपा केली । निजवस्तु दाविली माझी मज ॥१॥ माझे सुख दावियेले डोळा । दिधली प्रेमकळा ज्ञान मुद्रा ॥२॥ तया उतराई व्हावे कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसे केलें ॥३॥ नामा म्हणे निकी दाखवियेली सोय । न विसरावे पाय विठोवाचे ॥४॥

**दिव्य चक्षूंचे उन्मीलन:**— अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ! चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरुवे नमः ॥ असा गुरुगीतेत सद्‌गुरूचा महिमा वर्णन केला आहे. अज्ञानतिमिर निःशेष नाहीसे होण्यासाठी "शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा । म्हणजे शक्तिपातच्या संयोगानेच वेदान्तवाक्याचा उपदेश शिष्याला मिळाला पाहिजे. कारण त्याशिवाय डोळियांचा डोळा उघडत नाही. व आनंदाचे लेणेही जीवाला मिळत नाही. नामदेवांना तत्त्वमसि महावाक्य शक्तिपातसंयोगाने विसोबांकडून मिळाल्याने जो अनुभव आला तो किती अपूर्व आहे हे पाहाण्यासारखे आहे.

सद्‌गुरुचे पाय जीवे न विसंबावे । मन कळवावे वृत्तीसहित ॥१॥ डोळियाचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचे लेणे लेवविले ॥२॥ जन्ममरणाचें फेडियले सांकडे । कैवल्याचें पुढे दाखविले॥३॥ मोहरले तरु पुष्प फळभारें। तेचि निराकार सनकादिक ॥४॥ नामा म्हणे स्वामी खेचर माउली । कृपेची साउली केली मज ॥ ५ ॥

**ओहं सोहं भाव हरपला** :— नामदेवांचे अहं व सोहं हे दोन्ही भाव नाहीसे होऊन ते एकतत्त्वाशी समरस झाले. प्राणांची गती खेचरी म्हणजे सहस्त्रारात झाल्याशिवाय हे भाव नाहीसे होत नाहीत. हे कसे झाले ? खेचरस्वामींनी नामदेवांची खेचरी गती केल्यामुळेच हे झाले. शक्तिपाताने मल विक्षेपादि आवरणे गळून पडली की प्राण सहजतेने सुषुम्णेत प्रवेश करतो व मगच जीव ब्रह्मरूप होऊन त्याची तृप्ती होते. नामदेवांची अगदी अशीच तृप्ती झाली. ते म्हणतात खेचरे खेचरीं बुध्दि अगोचरी । नामा झडकरी देवो केला ॥ १ ॥ गुरूशिष्य झाले एक तत्त्व दखिलें । दोन्हीं देह निमालें एक तत्त्वी ॥ २ ॥ ओहुं सोहुं भाव हरपल्या श्रुति । नामयाची तृप्ति खेचरी जाती ॥ ३ ॥

**अभिमान गेला, संशय संपला व सृष्टी गुरूमय झाली** :— नामदेवांना सद्‌गुरूंकडून जी शक्ती प्राप्त झाली तिने त्यांचे सर्व दुर्गुण घालवून टाकले. दुर्गुण जाळून टाकून जीवाला सर्व बंधनातून सोडविणे हे शक्तीचे कार्यच आहे. त्याचा प्रत्यय

नामदेवांना पुढील प्रमाणे आला. सद्गुरूनि मज उपकार केला । अभिमान घालविला समूळ माझा ॥ १ ॥ फेडियेला माझा सर्वही संशयं । चित्त ब्रह्ममय केलें माझें ॥ २ ॥ मजलागी अवलोकिले कृपादृष्टी । गुरूमय सृष्टि दिसे मज ॥ ३ ॥ नामा म्हणे मज सद्गुरुविण काही । प्रिय ऐसे नाही जगत्रयीं ॥ ४ ॥

**संसाराचा उद्योग संपला–** शक्तिपातयोगाचा हेतूच संसाराची निवृत्ती करणे हा आहे. सद्गुरु भेटले म्हणजे ते शक्तिसंचार करुन जगन्मिथ्यात्वाचा व ब्रह्मसत्यात्वाचा उदय चित्तात करून जीवाला जन्ममरणं फेऱ्यातून सोडवितात. शक्तीने ज्ञानाग्नीची आवरणे दूर केली की तो प्रदीप्त होऊन हळूहळू जीवाचे जीवत्व घालवून त्याला मूळचे ब्रह्मस्वरूप प्राप्त करुन देतो. ही प्राप्ती आपल्याला झाली म्हणून नामदेव म्हणतात– सद्गुरु सारखा सोयरा जिवलग । तोडिला उद्योग संसाराचा ॥ १ ॥ काय उतराई व्हावे कोण्यागुणे । जन्मा नाहीं येणें ऐसे केले ॥ २ ॥ नामा म्हणे निकी दाखविली सोय । न विसंवे पाय खेचराचे ॥ ३ ॥

**आनंदाची दिवाळी झाली–** सद्गुरुकृपा म्हणजे आनंदाची दिवाळी होय. गुरोर्यस्यैव संस्पर्शात् परमानंदोऽभिजायते । गुरुं तमेव वृणुयात् नापरं मतिमान्नरं। ज्याच्या केवळ स्पर्शाने शिष्याच्या ठिकाणी परमानंद उसळून येतो तोच खरा गुरु होय. बुध्दिमान शिष्याने अशी आनंदाची दिवाळी करणाऱ्यालाच गुरु म्हणून स्वीकारावे. जो असा आनंद देणार नाही त्याला गुरु म्हणून स्वीकारण्यात काय हशील आहे ? नामदेवांना असा परमानंद देणारा गुरु भेटला. ते म्हणतात सुखाचा सुरतरु सद्गुरु खेचर । स्वरुप साक्षात्कार दाखविला ॥ १ ॥ विठ्ठल पाहतां मावळलें मन । ध्यानीं भरले नयन तन्मय झाले ॥ २ ॥ मी माझें होतें तें मज माजीं निमालें । जळे जळ गिळिलें जयापरी ॥ ३ ॥ जेथ आनंद आनंदु ओळला परमानंदु । नाम्या झाला वोधु विठ्ठल नामे ॥ ४ ॥

**गुरु हेच सर्वस्व:—सर्वही साधन खेचर चरण:–** शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की, मुक्तिदाता गुरुर्वागेका विद्यासर्वं विडंबका । काष्टभार श्रमादस्मादेकं संजीवनं परम् ॥

शक्तिसंपन्न गुरूचे एकमात्र वाक्य शिष्याला मुक्ती प्राप्त करून देते. इतर शास्त्रे विद्या इत्यादि सर्व त्याबाबतीत निरुपयोगी ठरतात. सर्व रोगांचे निवारण करण्या करिता एकमात्र संजीवनीसारखे दिव्य औषध हे सर्वोत्तम ठरते. कारण संजीवनी प्राप्त झाली की इतर काष्ठादि वनौषधींची प्राप्ती करण्याचे श्रम करावे लागत नाहीत. त्याचप्रमाणे एक समर्थ सद्गुरु भेटला की तो संजीवनी, चिंतामणी किंवा कामधेनुप्रमाणे फल देतो. विसोबा खेचरांच्या भेटीने हेच फल नामदेवांना प्राप्त झाले. ते म्हणतात, कृपेची साऊली अखंड लाधली । खेचर माउली भेटलिया ॥ १ ॥ आता मज भय नाहीं पैं कवणाचें । जन्ममरणाचें दुःख गेलें ॥ २ ॥ बंध मोक्षाची फिटली काजळी । समाधि लागली समाधीसी ॥ ३ ॥ नामा म्हणे

माझे सर्वही साधन । खेचर चरण न विसंबे ॥ ४ ॥

**शांति क्षमा दया देती आलिंगनः—**

सद्गुरुकृपेनेच सर्व दुर्लभ गोष्टी सुलभ होतात. शास्त्रकार म्हणतात " दुर्लभोविषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम् । दुर्लभा सहजावस्था सद्गुरोः करणांविना ॥ विषयत्याग, तत्त्वदर्शन व सहजावस्थादि दुर्लभ गोष्टी एकमात्र गुरुकृपेमुळे आपोआप सिद्ध होतात. नामदेवांना ह्या अनुभव विसोवा खेचरांनी कृपा केल्यावरच मिळाला. ते म्हणतात—सुखाचे सोयरे भेटती अंतरी । बाहेरी भितरी दिधलें क्षेम ॥१॥ सुखाची गवसणी घालोनियां मना । विटली वासना वोल्हावली ॥ २ ॥ वाचे उपरम मन झालें तन्मय । लागलासे लय परलक्षीं ॥ ३ ॥ शांति क्षमा दया देती आलिंगन । चित्त समाधान पावविलें ॥ ४ ॥ परतलिया दृष्टि इंद्रियांच्या वृत्ती । पावली विश्रांति ठायीं ठायीं ॥ ५ ॥ विष्णुदास नामा निजबोधें निवाला । खेचरे दिधला अभयकर ॥ ६ ॥

येथपर्यंत आपण गुरूपदेशापूर्वीची नामदेवांची स्थिती, विसोवा खेचरांनी त्यांच्यावर केलेली कृपा व त्यानंतर त्यांना आलेले अनुभव यांचा सविस्तर विचार नामदेवांच्या अभंगांच्या आधारे केला. कृपा म्हणजे शक्तिपात होय. ही कृपा म्हणजेच शक्तिसंक्रमण झाल्याशिवाय सर्व व्यर्थ होय असे नामदेवांसारख्या थोर संताला देवाने पटवून दिले. नामदेवांच्या सर्व भ्रामक समजुती गुरुकृपा झाल्यावरच दूर झाल्या. त्यांना विठ्ठलाचे खरे स्वरुप कळले. दिव्य अशी पराभक्ती त्यांना प्राप्त झाली. ही अनुभूती इतरांना मिळावी यासाठी त्यांच्या मनाला ओढ लागली. ती त्यांच्या शब्दात पाहून हा लेख संपवू.—नाचू कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावू जगीं ॥ १ ॥ सर्व सांडूनी माझाई । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ परेहून परते घर । तथे राहू निरंतर ॥ ३ ॥ सर्वांचे जे अधिष्ठान । तेंचि माझें रुप पूर्ण ॥ ४ ॥ अवघी सत्ता आली हातां । नामयाचा खेचरी दाता ॥ ५ ॥



# साधन दर्शन :

# साधका ! हा अवधारीं पंथराजु—

**प्रस्तावना—**

अश्वत्थ वृक्षाचे खरे स्वरूप काय आहे हे आता पाहावयाचे आहे. याच्या खऱ्या स्वरुपाचे ज्ञान झाले म्हणजे साधकाला आपणाला कोठे जाऊन पोहोचावयाचे आहे व आपण ज्या पसाऱ्यात सापडलो आहोत तो कसा मिथ्या आहे याची जाणीव होऊन आपल्याला मिळालेले साधन कसे श्रेष्ठ आहे व ते

नियमित, निष्ठेने, आदरपूर्वक, कळकळीने, खंड न पडता निरंतर केले पाहिजे याची जाणीव झाल्याशिवाय राहाणार नाही.

**ऊर्ध्वमूल म्हणजे काय ?**

संसाररूपी असार वृक्ष प्रत्येक जीवाला भासत असतो. या संसार वृक्षाचे मूळ ब्रह्म आहे. परब्रह्माचे ठिकाणी अनेक नामरुपांमुळे हा संसार खाली वाढलेला भासत असल्याने त्यापासूनच त्याची उत्पत्ती झाली आहे असे वाटते. त्या दृष्टीने त्याला ऊर्ध्व म्हटले आहे. वास्तविक हे परब्रह्म अद्वैत रूपाने व्यापक असल्याने वर, मध्ये व खाली असा त्याच्या बाबतीत भेद करता येत नाही. हे मूळ म्हणजे परब्रह्म न ऐकता येणाऱ्या अव्यक्त नादासारखे आहे. ज्याचा वास घेता येणार नाही. असा अव्यक्त सुवास म्हणजे हे परब्रह्म आहे. रतिक्रीडा न करताही जो निरपेक्ष आनद क्रिया किंवा प्रतिक्रियेवाचून स्वभावतःच असतो तो आनंद म्हणजेच परब्रह्म होय. ही परब्रह्मवस्तू ज्ञातृज्ञेयविरहित केवळ ज्ञानरूप असून सुखाने भरलेल्या गाळीव आकाशासारखी असते. ती कशापासून उत्पन्न होत नाही व कशालाही उत्पन्न करीत नाही. ह्या वस्तूसारखी दुसरी वस्तू नाही. ही ब्रह्मवस्तू आपल्या ठिकाणी आपणच अशी द्वैताद्वैतरहित आहे. अशी जी खरी ब्रह्मवस्तू ती या वृक्षाचे उर्ध्व आहे असे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे.

मनाचे सर्व संकल्प नाहीसे झाल्यावर जी वस्तू खाली राहाते तेच खरे स्वस्वरूप किंवा आत्मस्वरूप होय. "संकल्पजाते गलिते स्वरूपमवशिष्यते ॥ ५३ ॥ महोपनिषद अध्याय ४ मध्येही असे वर्णन केले आहे. स्वरूपालाच चैतन्य म्हणतात. हे चैतन्य योगी लोकांचा आत्मा असून ते आत्मबोधरूप आहे. ह्या चैतन्यमय आत्मबोधस्वरूप तत्त्वाला शैव लोक शिव, वैष्णव लोक विष्णू व शाक्त उपासक सच्चिदानंदमयी माता असे म्हणतात. या तत्त्वाची प्राप्ती सहस्रदल कमलामध्ये असणाऱ्या केवळ ब्रह्मरंध्रात होऊ शकते. इतरत्र कोठेही होऊ शकत नाही. पिंडब्रह्मांडाचा लय होण्याचे हे एकमात्र स्थान आहे.यासाठीच योगी, शाक्त, शैव, वैष्णव, गाणपत्यादी सर्व उपासकांचे हेच उपास्य स्थान आहे. षट्चक्रनिरुपणामध्ये या दृष्टीने म्हटले आहे की,—

शिवस्थानं शैवा परमपुरुषं वैष्णवगणः । लपंतीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे॥
पदं देव्या देवीचरणयुगलानंदरसिका । मुनींद्रा अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ॥

सहस्रारामधील या चैतन्याच्या स्थानालाच शैवगण शिवस्थान म्हणतात. वैष्णवलोक हे स्थान दुसरे तिसरे कोणतेही नसून परमपुरुष श्रीहरीचे हे स्थान आहे असे सांगतात. हरिहर हे दोघे एकरूप होऊन येथेच राहातात असे त्यांचे भक्त म्हणतात. देवीची भक्ती करणारे भक्त हे देवीपद म्हणजे शक्तिस्थान आहे असे सांगतात. काही काही मुनिश्रेष्ठ ह्या स्थानाला प्रकृतिपुरुषांचे निर्मल स्थान अशीही संज्ञा देतात. सारांश कोणी काही म्हटले तरी सर्वांचे अंतिम स्थान हेच सहस्रार

चैतन्यात्मा आहे यात शंका नाही.

शिवसंहितेच्या पंचम पटलामध्ये या उर्ध्वमुळ स्थानाचे व त्याच्या स्वामीचे पुढील प्रमाणे वर्णन केले आहे.

अतउर्ध्वं दिव्यरूपं सहस्रारं सरोरुहम् । ब्रह्मांडाख्यस्य देहस्य बाह्ये तिष्ठति मुक्तिदम् ।। १८६ ।। कैलासो नाम तस्यैव महेशो यत्र तिष्ठति । अकुलाख्योऽविनाशी च क्षयवृद्धिविवर्जितः ।। १८७ ।। यस्य स्मरण मात्रेण ब्रह्मज्ञत्वं प्रजायते । पापक्षयश्चभवति न भूयः पुरुषो भवेत् ।।

टाळूच्या वरच्या भागामध्ये सहस्रदल कमल आहे. जसे बाह्य ब्रह्मांड आहे तसेच शरीर आहे. मात्र या शरीरातील सहस्रार कमलामध्येच मुक्तिप्रदान करणारे हे चैतन्याचे स्थान आहे. हे स्थान अन्यत्र बाहेर कोठेही नाही. साधक जेव्हा या ठिकाणी जातो तेव्हा तो जीवनमुक्त होतो. म्हणून हे जीवनमुक्ती देणारे प्रसिद्ध स्थान आहे. हे स्थान कैलास या नावाने प्रसिद्ध असून त्या ठिकाणी निराकुल, अविनाशी, क्षयवृद्धिरहित व मुक्ती प्रदान करणारे साक्षात् श्रीभगवान महेश्वर विराजमान झालेले असतात.

मूलधाराच्या ठिकाणी भूलोकाचे प्रथम स्थान आहे. सहस्रारातील सत्यलोक हे सातवे स्थान आहे. या ठिकाणी पोहोचल्यावर साधक पुन्हा जन्ममृत्यूच्या चक्रात सापडत नाही. असा वेदाचा निर्वाळा आहे.

या सातव्या स्थानामध्ये अत्यंत तेजोमय, देदीप्यमान व दिव्य ज्योतिस्वरूप असलेले देवाधिदेव महादेव परम गुरुस्वरुपामध्ये सहस्रदल कमलावर विराजमान झालेले असतात. हे खरे गुरुतत्त्वाचे स्थान आहे. हे स्थान चंद्र प्रकाशाच्या अमृतमय व सुधारसयुक्त सरोवराने भरलेले असून आनंद सागराने ते परिपूर्ण आहे. " नास्ति तत्त्वं गुरोःपरम् ।। " म्हणजे गुरुतत्त्वापेक्षा आणखी मोठे दुसरे कोणतेही तत्त्व नाही असा सकल शास्त्रांचा सिद्धांत आहे. यासाठीच या स्थानाचे यापेक्षा अधिक वर्णन करता येणे शक्य नाही. वेदसुद्धा नेति नेति म्हणून थकून गेले. ब्रह्मरंध्राच्या जागी सुषुम्णेचे द्वार मोकळे आहे. त्या ठिकाणी सहस्रार चक्र असून तेथे सहस्रदल कमल आहे. त्या ठिकाणी गुरुतत्त्वाचे ध्यान केले असता किंवा त्या स्थानाचे नुसते स्मरण केले की ब्रह्मज्ञान होते व पापक्षय होऊन ध्यानी पुरुष म्हणजे साधक जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो.

असा या ऊर्ध्वमूलाचा महिमा अपार आहे. शिवसंहितेत म्हटले आहे की :—

ब्रह्मरंध्रे मनोदत्त्वा क्षणार्धं यदि तिष्ठति । सर्व पाप विनिर्मुक्तः स याति परामां गतिम् १७३ ।। यस्मिन् लीनं मनोयस्य स योगी मयि लीयते । अणिमादि गुणान् मुक्त्वा स्वेच्छया पुरुषोत्तमः ।। १७४ ।। तस्माद्गलितपीयूष पिबेद्योगी निरंतरम् । मृत्योर्मृत्युं विधायाशु कुलं जित्वा सरोरुहे ।। १९२ ।। अत्र कुंडलिनीशक्तिर्लयं याति कुलाभिधा । तदा चतुर्विधा सृष्टिर्लीयते परमात्मनि ।। १९३ ।।

ज्यावेळी साधकाचे मन ब्रह्मरंध्रामध्ये क्षणमात्र का होईना स्थिर होते त्यावेळी तो सर्व पापापासून मुक्त होऊन त्याला मोक्षाचा लाभ होतो. यात कसलीही शंका बाळगण्याचे कारण नाही. ज्या योग्याचे मन ब्रह्मरंध्रामध्ये सहस्रारात लीन होते तो शिवाशी एकरूप होऊन जातो. असा श्रेष्ठ पुरुषच स्वतःच्या इच्छेने अणिमादि गुणांच्या महान ऐश्वर्याचा उपभोग घेऊन शेवटी कृतार्थ होतो. सहस्रदलकमलातून जो अमृताचा स्राव होत असतो त्याचे प्राशन योगी निरंतर करीत असतो. तो मृत्यूला जिंकून चिरंजीव होतो. या सहस्रदल-कमलामध्येच कुलरूप कुंडलिनी शक्तीचा लय होतो. ज्यावेळी हा लय होतो, त्यावेळी चतुर्विध सृष्टी परमेश्वरामध्ये लीन होते.

**संसारवृक्षाचा विस्तार :–** कुंडलिनी ही भगवंताची चिन्मयी सत्ता असून ती नाना प्रकारच्या भेदरूपी सृष्टीची स्थूल व सूक्ष्म जगताच्या रूपाने कल्पना करून उभारणी करते. "जगत्संसृष्टिरूपा सा निर्माणे सततोद्यता" असे जे शिव-संहितेत म्हटले आहे त्याचा अर्थ असा आहे की ही कुंडलिनी शक्तीच जगताची अनेक प्रकारे रचना करीत असते. ही जगदुत्पत्ती शक्तीच्या द्वारा कशी घडते हेच आता पाहावयाचे आहे.

ब्रह्म सत्स्वरूप आहे. जगाच्या उत्पत्तीपूर्वी तेच एकमात्र ब्रह्म होते हे सांगताना छांदोग्य उपनिषदात असे म्हटले आहे की "सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥ छां. ६-१ ॥ जगाच्या उत्पत्तीपूर्वी एक अद्वितीय असे सत् मात्र होते. "तदैक्षत बहु स्यां प्रजायेति तत्तेजोऽसृजत । तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत ।" त्या सत् ब्रह्माला मी अनेक व्हावे अशी इच्छा झाली. त्याबरोबर त्याच्यापासून तेज उत्पन्न झाले. त्या तेजरूप शक्तीला आपण खूप व्हावे व नाना प्रकारांनी उत्पन्न व्हावे असे वाटले. या इच्छेबरोबर ब्रह्माची तेजरूप सत्शक्ती प्रवृत्त होऊन विश्वाची उभारणी झाली. ऐतरेय उपनिषदात सुद्धा असे म्हटले आहे की "स ईक्षत लोकान्नुसृजा इति, स इमान् लोकानसृजत । म्हणजे त्या ब्रह्माने इच्छा केली की आपण लोकांची सृष्टी करावी. त्याप्रमाणे त्याने सृष्टी निर्माण केली. प्रश्नोपनिषदात सुद्धा "स ईक्षा चक्रे स प्राणमसृत (६-३) म्हणजे त्याने इच्छा केली व प्राणसृष्टी निर्माण केली असे म्हटले आहे.

श्वेताश्वतरोपनिषदामध्ये सृष्टी निर्माण करणाऱ्या या शक्तीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की – ते ध्यानयोगानुगता अपश्यन् । देवात्मशक्तिं स्वगुणै-र्निगूढाम् ॥ १-३ ॥ परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रियाच ॥ ६-८ ॥ अखिल सृष्टीचे एकमात्र कारण म्हणजे हीच देवात्मशक्ती होय. ही देवात्मशक्ती कुंडलिनी हेच प्रथमारंभीचे सृष्ट तत्व होय. ईश्वर हा सृष्टीचालक कारणरूप असून त्याचीच दैवी शक्ती हे त्याचे भौतिक वा प्राकृत कार्य होय.

ब्रह्मवेत्यालोकांनी कोणत्याही प्रमाणांनी ज्ञात न होणाऱ्या मूल कुंडलिनीशक्ती-तत्वाच्या बाबतीत इतर सर्व उपायांची गती कुंठित होते हे जाणून ध्यानयोगस्वरूप शक्तिपात योगाचा अवलंब करून त्या परममूलकारणाचा त्यांनी स्वतःच अनुभव घेतला. या दैवी शक्तीचेच ज्ञान, इच्छा व क्रियाशक्तिरूप त्रिविध भेद होतात. या तीन रूपांनी जरी ती विशेष रूपाने अनुभवाला येत असली तरी ही पराशक्ती नानाप्रकारची आहे असे दिसून येते.

ही शक्ती परिपूर्ण आहे. ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।। असा ईशावास्योपनिषदाच्या सुरवातीचा शांतीपाठ या अर्थाचा द्योतकच आहे. ते परब्रह्म पूर्ण आहे. त्यापासून निष्पन्न होणारे शक्तीच्या रूपाने असणारे कार्यब्रह्म ही पूर्ण आहे. कारण पूर्णापासूनच पूर्णाची उत्पत्ती होते. त्याचप्रमाणे प्रलय कालाच्या वेळी हे शक्तिरूप पूर्ण कार्यब्रह्माचे पूर्णत्व आपल्या-मध्ये सामावून घेऊन ते पूर्ण परब्रह्मच केवळ शिल्लक राहाते. या प्रमाणे पूर्णामधून पूर्ण काढून घेतले म्हणजे ते विकासक्रमाने बाहेर पडले तरी बाकी राहिलेले पूर्णच असते. यावरून हे सिद्ध होते की शेष शक्तीही सर्व अमर्याद पूर्ण आहे. सामान्यतः बीजभूतशक्ती कार्यान्वित होताना गतीरूप घेऊन संपते. पण आरंभिक शक्ती जर अनंत असली तर ही गोष्ट लागू पडत नाही. ती संपत नाही. बीजभूत शक्ती जर अनंत असेल तर ती गतीरूपाने कार्यान्वित होताना अमर्याद कार्य करू शकते. इतकेही करून राहिलेली शेषशक्ती अमर्यादच असते. सामान्यतः खर्ची पडणाऱ्या शक्तीची गोष्ट अशी नसते. शेषशक्ती हा केवळ शब्दप्रयोग आहे. अथर्ववेदात या अनंत शेषशक्तीला उच्छिष्ट ब्रह्म म्हटले आहे. उच्छिष्ट म्हणजे शिल्लक राहिलेले असा आहे. या शक्तीच्या म्हणजे उच्छिष्ट ब्रह्माच्या द्वारे सृष्टीची रचना होते व ही शक्तीच सर्वाला आधार आहे हे सांगताना उच्छिष्ट ब्रह्मसूक्तात म्हटले आहे की "नामरूपास उच्छिष्टाचाच आधार आहे. या उच्छिष्ट शक्तीच्या आधारावरच लोकांची वसती होते. इंद्र, अग्नी व अखिल विश्व या शक्तीतच सामावलेले आहे. द्युलोक, भूलोक, सर्वभूतमात्र, जल, समुद्र, चंद्र, वायू या शक्तीतच स्थिर झालेले आहेत कारण हे सर्व पदार्थ शक्तीपासूनच उत्पन्न झालेले आहेत. सत्, असत्, मृत्यू, अन्न, बल, प्रजापालक, धन, स्वीकारण्यास व नाश करण्यास योग्य असे सर्व पदार्थ आणि सर्व शोभा उच्छिष्ट ब्रह्मशक्तीतच आश्रित झालेले आहेत. ज्ञान, विश्वाची उत्पत्ती करणाऱ्या दहा शक्ती धारण करणारे देव नाभिचक्राच्या सभोवार असणाऱ्या आऱ्यांप्रमाणे सर्व बाजूंनी उच्छिष्टातच स्थित आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, उद्गीथ, स्तुती, स्तवन, हिंकार, स्वर, सामगानाचे आलाप हे सर्व या उच्छिष्ट ब्रह्मशक्तीचा आविष्कार असल्याने त्यातच आहेत. जसा मातेच्या उदरात गर्भ असतो त्याप्रमाणे इंद्र, अग्नी, पावमान, वायूची सूक्ते, महानाम आणि महाव्रताचे मंत्रभाग ही सर्व यज्ञाची अंगे उच्छिष्टापासून उत्पन्न होतात. दीक्षा, अग्निहोत्र,

श्रद्धा, वषट्कार, व्रत, तप, दक्षिणा इष्ट, पूर्त हे सर्व त्या शक्तीचा अविष्कारच आहे. सत्यभाषण, नम्रता, कल्याण, स्वधा, बल, अमरत्व सहनशक्ती हे सर्व त्या शक्तीचेच गुण असून तिच्यामुळेच त्यांना अस्तित्व प्राप्त होते.

ऋत, सत्य, तप, राष्ट्र, श्रम, धर्म, कर्म, भूत, भविष्य. वीर्य लक्ष्मी, बलिष्ठातील बल, समृद्धी, शक्ती, संकल्प, क्षात्र, भूमी, संवत्सर, अन्न, ग्रह, पक्ष, महिने, ऋतू, मेघगर्जना जलप्रवाह, वाळू, रेती, पाषाण, औषधीवनस्पती, गवत, मेघ, विजा व पर्जन्य या सर्वांचा जो विस्तार दिसतो त्याचे कारण ही उच्छिष्ट शेषशक्तीच आहे. हे सर्व पदार्थ त्या शक्तीचे आश्रित आहेत.

सिद्धी, प्राप्ती, समाप्ती, व्याप्ती, महत्त्व, वृद्धी, ऐश्वर्य, पुराण, साम. छंद, ऋचा, प्राण, अपान, चक्षू, श्रोत्र, भौतिक व भौतिक पदार्थ, आनंद, मोद, प्रमोद, देव, पितर, मनुष्य, गंधर्व, अप्सरा, व सर्व देवता हे सर्व उच्छिष्ट शक्तीपासून निर्माण झालेले आहेत. उच्छिष्ट ब्रह्म म्हणजे कार्यब्रह्मरूप शेष कुंडलिनी शक्ती होय. जे जे नाम व रूप दृष्टीस पडते ते ते या शक्तीचाच अविष्कार आहे. याचा अर्थच असा आहे की ज्यावेळी या शक्तीच्या आश्रयाने नामरूपात्मक पिंडब्रह्मांडाची रचना होते तेव्हा विश्वाची उभारणी झाल्याचे भासते. ज्याला नाम नाही आणि ज्याला रूप नाही अशी एकही वस्तू विश्वात नाही. ही नामरुपात्मक रचना शक्ती कडून कशी होते हे पुढे पाहू.



# " ललितासहस्रनाम "

## आणि भास्करराय प्रणीत " भास्कर–भाष्य "

*लेखक :– मुरलीधर माधव घाणेकर*

एम्. ए. (मराठी व संस्कृत), डिप्. एड्. निवृत्त शिक्षण उपसंचालक, पुणे.

" श्रीललिता सहस्रनाम " ब्रह्मांड पुराणाच्या उत्तर भागात आहे. श्रीमद्भगवद्गीता महाभारतीय युद्धाला तोंड लागणार त्यावेळी " महाभारतात " कथन करण्यात आली किंवा श्रीविष्णुसहस्रनाम ज्याप्रमाणे पितामह भीष्माचार्य कौरवपांडवीय युद्धात शरपंजरी पडल्यावर " महाभारतात " कथन करण्यात आले त्याप्रमाणेच ब्रह्माण्डपुराणात " श्रीललितासहस्रनाम " हे स्तोत्र आढळून येते. 'श्री विष्णुसहस्रनामावर " ज्या प्रमाणे थोर आचार्यांची व्याख्या ज्येष्ठपणे वा, श्रेष्ठपणे वाचकांचे मन आकर्षून घेते, त्याचप्रमाणे श्रीमग्दंभीरराय दीक्षित भारती यांचे सुपुत्र श्रीभास्करराय तथा भासुरानंदनाथ यांची " श्रीललितासहस्रनाम " व्याख्या आपलें मन वेधून घेते. श्रीललितासहस्रनाम हे देवतास्तोत्रच नव्हे तर ते मन्त्रशास्त्रसर्वस्व मानण्यात येते. अशा मंत्रशास्त्रसर्वस्वाचे [illegible] ग्रंथाला

"सौभाग्य भास्कर" व्याख्या वारा कलाविभागांत भास्करराय यांनी लिहिल्यामुळे आपणास या अपूर्व ग्रंथाचे वैशिष्टय आपापल्या आकलनशक्त्यानुसार समजणे तरी शक्य झाले आहे. नसता हे स्तोत्र केवळ मुखोद्गतच राहिले असते.

पूर्वकालीन विद्योपासक श्रेष्ठ अशा अगस्ती महामुनीने भगवान् हयग्रीवाच्या तोंडून हे माहात्म्य श्रवण केले. ब्रह्मांडपुराणाच्या शेवटच्या भागात म्हटले आहे "इत्येवं नामसहस्रं कथितं ते घटोद्भव। रहस्यानां रहस्यं च ललिताप्रीतिदायकम्।। अनेन सदृशं स्तोत्रं न भूतं न भविष्यति। सर्व रोगप्रशमनं सर्वसंपत्प्रवर्धनम्।।" इत्यादी. आधिभौतिक किंवा वैज्ञानिक सृष्टीतील रहस्ये जाणण्यासाठी वा त्यांची उकल करण्यासाठी ज्याप्रमाणे काही प्रभावशाली साधने वा उपकरणे वापरावी लागतात तसाच प्रकार आध्यात्मिक व आधिदैविक सृष्टीतहि आहे. परमेश्वराचे विश्वरूपदर्शन घडण्यासाठी आणि त्याचा ऐश्वर योग पाहाण्यासाठी अर्जुनाला दिव्यचक्षुचे साह्य घ्यावे लागले आणि तरीही ते अतिभव्य उग्र प्रखर दर्शन त्याला पाहाण्याचा धीर होईना व पुन्हा साध्या डोळ्यांनी साधे मानुषी रूपच मला पाहू दे असे अर्जुन म्हणाला. तप्तलोहरस, लोखंडाच्या भट्टयातील जाळ, साधे यंत्राने काम करीत असता धातूंच्या विद्युत्संघर्षाने उडणाऱ्या किटाळचा पाहाण्यासाठी डोळ्या समोर जाड निळ्या, काळ्या काचा धराव्या लागतात, तेव्हा कोठे कारागीर काम करू शकतो व तो तप्त लोहरस व जाळ पाहू शकतो. तसेच आध्यात्मिक व आधिदैविक क्षेत्रात विशेषस्थान व विशेष धारणा प्राप्त करून घेतली नाही तर प्रज्ञा लंगडी पडते. आचार्यांना श्रीविष्णुसहस्रनामाचे रहस्य अवगत झाले. ते त्यांच्याइतकी प्रज्ञा नसणाऱ्यांना, श्रद्धा नसणाऱ्यांना व तपःसामर्थ्याचे विशिष्ट बळ नसणाऱ्यांना कसे साधणार? महामुनी आगस्तीने ब्रह्मांडपुराणातील १ मंत्र २ जप, ३ न्यास. ४ पूजा, ५ पुरश्चरण, ६ होम, ७ रहस्यस्तोत्र अशा सात खंडात ललितांवानाम सहस्राचे रहस्य साक्षात भगवान् हयग्रीवांकडून समजून घेतले. "अथर्वशीर्ष" ज्याप्रमाणे 'अशिष्याला" देऊनये असे म्हटले आहे. कारण ते विद्यादान अपात्र होय, ते बीजारोपण अस्थानी होय तसेच येथेही रहस्यश्रवणाची अगस्तीमुनीची पात्रता विचारात घेऊनच त्यांना भगवान् हयग्रीवांनी ललिताम्बा-नामसहस्राचा उपदेश केला. आता पाहू गेल्यास अनेक सहस्रनामे आहेत, त्यांचे नित्य पाठांतर, पत्र-पुष्प पूजनही चालू आहे. उपासकांना त्यांच्या उपासनेची हेतुसिद्धी लाभते. आणि त्या सहस्रनामांचा यत्किंचितही अनादर न करता असे म्हणता येईल की शब्दार्थ गांभीर्य, अलंकारादी पुष्टि, अदोषता व गौरव या दृष्टींनी "ललितासहस्रनाम' अन्य सहस्रनामांपेक्षा श्रेष्ठच ठरेल. पूर्वकालीन किंवा सद्यःकालीन विचारसरणीप्रमाणें पाहता या जगात सर्वांना हवे हवेसे असणारे जे काही तेच 'सुख' आणि ते संपादणे म्हणजेच पुरुषार्थ मिळवणे होय. हा पुरुषार्थ कृत्रिम व अकृत्रिम अशा दोन प्रकारांचा असतो. 'काम' हा कृत्रिम

प्रकारानें मिळणारा, तर 'मोक्ष' हा अकृत्रिम प्रकारानें मिळणारा! कृत्रिम व अकृत्रिम अशा दोन्ही मार्गांनीं साध्य होणारा पुरुषार्थ म्हणजे 'धर्म' होय आणि या 'धर्मा' मुळेच तर 'अर्थ' हा सर्वांना अभिलाषणीय पुरुषार्थ साध्य होत असतो! म्हटलेच आहे की "धर्मात अर्थश्च कामश्च" सध्याची विचारसरणी मात्र थोडी भिन्न आहे. अर्थ प्रधानतेमुळे "अर्थ-संपादन" म्हणजेच चतुर्विध पुरुषार्थ संपादन असा समज झालेला आहे. पुरुषार्थ-संपादन देखील ज्ञान-विज्ञानाच्या साह्याने त्या त्या प्रकारास योग्य असा चित्तैकाग्रपणा साधला तरच मिळू शकेल. अर्थात् निरनिराळ्या प्रकारच्या कर्मपरिपाकामुळे निरनिराळ्या चित्तवृत्ती धारण करणाऱ्या लोकांकरिता परमपुरुषार्थ प्राप्त व्हावा म्हणून श्री भगवान् यांनीं परंपरागत विविध विद्यांचे अध्ययन करण्यास सांगितले आहे. उदाहरणार्थ वेद, शास्त्रे, स्मृती, पुराणे, इतिहास इत्यादी विद्यांचा अभ्यास आवश्यकच ठरतो. म्हणून आपापल्या आकलन शक्त्यानुसार कोणत्या तरी विद्यांचा अभ्यास करणे अधिक इष्ट व प्रयुक्त होय. तेव्हा आधी कर्म मार्ग आणि नंतर ब्रह्मविज्ञान हा सरळ मार्ग होय काही काही प्रज्ञावन्त मात्र सरळ ब्रह्मविज्ञानाचा मार्ग घेऊन सकल पुरुषार्थ साधन करतात तर काही अल्पप्रज्ञ पण सदाचरणी लोक आपल्या अपार पुण्यसंचयाने वैदिक कर्ममार्गाचे आचरण करतात व सकल पुरुषार्थ प्राप्तीचे म्हणजेच निरतीशय आनंदाचे ध्येय गाठतात. काही तांत्रिक मार्गाचे अवलंबन करून श्रीसद्गुरुकृपेने श्रीमत्त्रिपुरी देवीची आराधना करतात. दोन्ही पक्षांतील लोक एकाच ध्येयाकडे जात असतात हे निश्चित. आनन्द ज्ञानरूप अमृताचा आस्वाद म्हणजेच चारी पुरुषार्थांची सिद्धी होय. सारांश स्मृती-तंत्र-पुराण इत्यादींचे वेदमूलकत्व प्रमाण असल्यामुळे मार्गाची चिकित्सा गौण होय!

सांप्रत श्रीललिता सहस्रनाम ग्रंथावर भाष्य लिहीत असता त्यातील रहस्य, मंत्रोद्धार, अर्थान्तर इत्यादि कितीतरी चमत्कृतीपूर्ण माहिती श्रीमद्भास्कररायांनी सांगितलेली आहे. प्रसंगानुसार तांत्रिक मार्गावलंबन करणाऱ्या साधकांना विविध प्रकारांची परा व अपरा पूजाप्रकारही सांगितले आहेत. न्यास, अनुष्ठान, पुरश्चरण इत्यादी विधीची माहिती दिली आहे. अनेक ग्रंथांचे आलोडन करून मिळणारी माहिती एके ठिकाणी अशी या भाष्यात दिसून येते. ही सर्व माहिती गुरुमुखातून मिळालेली असून सुद्धा विद्वानांना चमत्कृती बोध व्हावा म्हणूनही काही माहिती सांगितली आहे. तसेच काही काही गूढ मंत्रांचे संरक्षण यथाविधी व्हावे म्हणून विवरण करीत असताना 'इदं गुरुमुखैक वेद्यं' 'इदं गुरुकुलाज्ज्ञेयम्' 'अत्र रहस्यं देशिकवरादवगन्तव्यं' असे म्हणून मन्त्रमञ्जूषा उद्घाटित न करता मान्त्रिक धुरीणता देखील या भाष्यात साधलेली आहे.

एवढे प्रास्तविक झाल्यानंतर आता श्रीमद्भास्करराय दीक्षित यांच्या श्रीचरणांना अभिवादन करून त्यांच्याविषयी वाचनात आलेली थोडी ऐतिहासिक

माहिती येथे प्रथम सांगणे अप्रस्तुत ठरणार नाही असे वाटते. श्रीभास्करराय यांनी सौभाग्यभास्कर या बारा कलात्मक ललितासहस्रनामटीकेच्या अखेरीस असे म्हटले आहे की "मोदच्छाया (संवत १७८५)" मध्ये शरद ऋतूंत आश्विन मासी नवमी (शुद्ध) सोमवारी ललितानाम सहस्रभाष्य लिहून संपविले. हाच काय तो पहिला उपलब्ध पुरावा. त्या आधारे पाहू जाता २४२ वर्षापूर्वी म्हणजे क्रिस्ताब्द १७३० मध्ये हे भाष्य लिहून पुरे केले. त्यावेळी पुणे येथे पहिला बाजीराव पेशवा याची कारकीर्द चालू होती, पण या पुराव्याशिवाय त्यानंतर गुरुपरंपरा आणि सांप्रदायिकता या आधारे जे काही वास्तविक चरित्र उपलब्ध होऊ शकले आहे त्या आधाराने पुढील माहिती अधिक विश्वसनीय ठरते आहे.

"श्रीमद्भास्करराय भारती दिक्षित दक्षिणप्रातांतील "विजापूर" जवळ असणाऱ्या कर्नाटक देशाचे मूळ रहिवासी, यांचे वडील श्रीगंभीररायभारती दीक्षित फार विद्वान, सोमयाजी आणि अनेक शास्त्रग्रंथांचे निर्माते असून व राजनीति धुरीण असून विजापूर येथील यवनराजाचे सचिव होते. यवनराजाने सांगितल्यामुळे त्यांनी समग्र महाभारताचे फारशी भाषेत भाषांतर केले आणि म्हणून त्यांना "भारती" असे अन्वर्थक नाव मिळाले. स्वतः भास्कररायांनीच हे कौस्तुभ छंदात दोन श्लोकात वर्णन केले आहे. गंभीरराय यांनी स्वकृत श्लोकात्मक विष्णुसहस्रनाम पद्यात स्वतःचा वंशक्रम पुढील प्रमाणे दिला आहे. तो येथे वाचकांना सहजासहजी लक्षात यावा म्हणून पुढील क्रमाने मांडण्याचा प्रयत्न :—

मूळ पुरुष, एकनाथ गोत्र विश्वामित्र,

गुरुपरंपरा :— |

मुद्गलभट्ट (गंभीररायांच्या मातेचा तुकदेव

(वत्सगोत्र | पणजा) —प्रसिद्ध वैद्य— |

नारायण यमाजि पण्डित (भार्या चंद्रम्मांबा)

अण्णाजि गम्भीरराय (भार्या कोनवामां)

नारायण —

(गंभीररायांचे) मामा व गुरु भास्कर

श्रीगंभीरराय भागवत संप्रदायातील पण त्यांचे गुरु आचार्य नारायण हे विजापूर येथील राजवैद्य मुद्गलभट्टाच्या वंशातील. गंभीरराय राजकार्यानुरोधें करून विजापूर येथे राहिले. पुढे कार्यवशात ते भागानगर म्हणजे दक्षिण हैद्राबादेस आपल्या भार्येसह जाऊन राहिले आणि तेथेच त्यांना बालभास्कर या सुपुत्राचा लाभ झाला. तेथेच वडिलांच्या सान्निध्यात ते शास्त्राध्ययनांत अत्यंत पारंगत झाले. मोठमोठ्या विद्वानांनाही आश्चर्य वाटण्याइतकी विद्या त्यांनी बालपणीच संपादन केली. त्यानंतर तीर्थयात्रेच्या निमित्ताने गंभीरराय काशीक्षेत्री गेले असता तेथेच भास्कर यांचा उपनयन संस्कार झाला. नंतर परत दक्षिणेत नारायणपेठ

या तत्कालीन प्रसिद्ध शहरानजीकच्या लोकपल्ली या गांवी ते राहू लागले. येथेच दैवी साक्षात्कार घडून आलेल्या श्रीनृसिंह यांच्या जवळ राहून भास्कररायाने अष्टादश विद्या हस्तगत केल्या. आणि खराखुरा सूर्य ऐन दुपारी आकाशमध्यांत जसा तळपतो त्याप्रमाणे ज्ञानी व विद्वानांच्या मण्डलात हा भास्कर विद्येच्या अपूर्व दीप्तीने तळपू लागला. त्यानंतर गुजरात येथील प्रसिद्ध सुरत शहरी त्यांचे वास्तव्य घडले, येथे प्रकाशानन्दनाथदीक्षा नामक शिवदत्तशुक्ल नावाच्या श्रेष्ठ आचार्यांकडून त्यांनी उपासनामार्गप्रवीण होऊन पूर्णाभिषेकदीक्षा घेतली व त्यांच्याआज्ञेनुसार दैवी साक्षात्कार झालेल्या भास्कररायांनी सर्वभरतखंण्डाचे पर्यटण आरंभिले.

"वैदिक कोश" नावाचा श्रीभास्करराय यांनी लिहिलेला एक ग्रंथ श्री. आर. जी. भांडारकर या सुप्रसिद्ध आंग्लविद्याविभूषित व प्राच्य विद्येतील प्रकांडपण्डित डॉक्टर महाशयांनी छापून प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यांनी त्यावेळच्या माहितीप्रमाणे असे नमूद केले आहे की, भास्करराय हे बीड किंवा सांगली येथील राहाणारे. यांना कुष्ठमहारोगाने जर्जर केले होते. हे एक माधुकरी वृत्ती पालन करणारे व त्या अन्नावर उदरपोषण करणारे भिक्षुक होते. कुष्ठमहारोगापासून रक्षण व्हावे म्हणून त्यांनी सूर्याची उपासना केली आणि तृचभास्कर नावाचा एक ग्रंथ लिहिला." इत्यादी हे भास्कररायाचे ऐतिहासिक वृत्त अनाकलनी वाटते. कारण आजही विद्वज्जनांच्या समाजात भूषणभूत असणाऱ्या श्रीमद्भास्कररायांच्या शिष्य-प्रशिष्य संप्रदायास या गोष्टीची मुळीच माहिती नाही. तेव्हा ही माहिती निराधार ठरली आहे. या उलट तृचभास्कर ग्रंथ लेखनाचा खराखुरा इतिहास पुढील प्रमाणे सापडतो तो मनोरंजक व बोधपरअसल्यामुळे तो येथे थोडक्यात सांगणे आवश्यक आहे.

श्रीशिव छत्रपती शिवाजी महाराजांचे नातू श्री. शाहू राजे यांची दिल्लीहून औरंगजेबाच्या मृत्यूनंतर १७०७ मध्ये सुटका झाली. त्यानंतर १७०८ मध्ये त्यांनी सातारा सर करून स्वतःस राज्याभिषेक करून घेतला व अष्टप्रधानांच्या नेमणूका केल्या. त्यांचे सेनापती धनाजी जाधव वारल्यानंतर हे काम बाळाजी विश्वनाथ यांच्याकडे आले आणि पुढे निळोजी पिंगळे यांचे पेशवेपदही शाहूराजांनी बाळाजीलाच दिले. बाळाजी १७२० मध्ये मृत्यू पावल्यानंतर शाहूराजांनी बाजीरावास पेशवाईची वस्त्रे दिली. पहिले बाजीराव पेशवे या नात्याने त्यांनी १७४० पर्यंत केलेली कामगिरी अतुलनीय, अविस्मरणीय व अत्युज्वल आहे याची साक्ष इतिहास खडेपणाने आजही देत आहे. इकडे सेनापती धनाजी जाधव यांचे चिरंजीव श्री. चंद्रसेन जाधव हे भास्कररायांचे प्रशिष्य झाले. चंद्रसेन जाधवांना पुत्रसंतान नसल्यामुळे ते सदैव खिन्नमनस्क असत. एकदा आपल्या भार्येसह श्रीगुरू भास्करराय यांच्या दर्शनासाठी ते आले असता त्यांनी श्रीगुरूचरणी प्रार्थना केली की हे भगवन् आम्ही उभयता पुत्रकामेच्छू आहोत आपल्या कृपेने माझी कामना सिद्ध व्हावी हीच प्रार्थना. कृपानिधि

गुरू भास्कररायांनी त्यांचा हेतू ओळखून व स्वहस्ते त्यांना प्रसाद देऊन म्हणाले, " माझ्या अशीर्वादिकरून तुला पुत्र संतान होईल. " त्यानंतर गुरुवचन शिरसामान्य करून चंद्रसेन जाधव भार्येसह आपल्या राज्यात परतले. इकडे भास्करराय देखील स्वतःच्या ठरलेल्या कार्यक्रमानुसार धर्मप्रचारासाठी फिरतीवर रवाना झाले. श्रीभास्कररायांच्या अमोघ अशीर्वचनामुळे चंद्रसेन-भार्या लौकरच आपन्नसत्वा (गर्भवती) दिसू लागली. दरम्यानच्या काळात श्रीभास्कररायांच्या कृपेने मंत्रसिद्ध प्राप्त झालेले श्रीनारायणदेव चंद्रसेन जाधव यांच्या राजधानीस आले. नारायणदेवांनी भ्रमरांबिका (पार्वती देवी)ची आराधना करून वाक्‌सिद्धी प्राप्त करून घेतली होती. चंद्रसेन जाधवाच्या राजधानीचे गाव 'भालकी' येथे नारायणदेव आले होते. चंद्रसेन जाधव यांना श्रीशाहू छत्रपतींकडून आपल्या वडिलांचे सेनापतीपद मिळाले नव्हते. नसता ते धनाजी जाधवांप्रमाणे साताऱ्यासच राहाते! पेशव्यांच्या कुळातील पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथ वारल्यानंतर त्याचा मुलगा बाजीराव यास श्रीशाहू छत्रपतींनी पेशवाईची वस्त्रे दिली तेव्हापासूनच बाजीराव पेशवे व चंद्रसेन जाधव यांच्यात काही कारणपरत्वे वैमनस्य आले. त्यामुळे चंद्रसेन जाधवाने दिल्लीपती यवनराजाचा आश्रय घेतला. दिल्लीपती मोहम्मदशहाने आपला मांडलिक दक्षिणचा सुभेदार निजाम आसफजाह याच्याकडून वेळच्या वेळी करभार वसूल कण्यासाठी चंद्रसेन जाधव याची कर्नाटक प्रदेशात करभारवसुलीच्या मुख्य व महत्त्वाच्या अधिकारपदावर नेमणूक केली आणि म्हणून 'भालकी' येथे चंद्रसेन जाधवांनी आपल्या राजधानीचे ठाणे वसविले.

अशा या 'भालकी' गावी श्रीनारायणदेव आले. नारायणदेवांचा महिमा व त्यांचा वाक्‌सिद्धिप्रभाव श्रीचन्द्रसेन जाधवांच्या कानी आला होताच! तेव्हा त्यांच्या दर्शनास भार्येसह जाऊन त्यांनी आपल्या भार्येला कोणते संतान होईल असे विचारले असता नारायण देव यदृच्छेने बोलले की मुलगी होईल. त्यावेळी चन्द्रसेन जाधव त्यांना पुन्हा म्हणाले की, " आपण 'पुत्री (मुलगी) असे कसे बरे म्हणता? आमचे गुरुमहाराज श्रीभास्करराय यांनीं तर 'पुत्र' संतान होईल असे म्हटले आहे. " श्रीभास्करराय यांचे नांव ऐकताक्षणीच नारायणदेवांनी श्रीगुरुंचे स्मरण करून त्यांना साष्टांग नमन केले आणि एकदम तो सिद्ध पुरुष नारायणदेव रागाने भडकून जाऊन चन्द्रसेनाला निर्भर्त्सनापूर्वक बोलला, हे मुर्खा! काय केलेस तू हे? मी सुद्धा श्रीभास्कररायांचाच शिष्य आहे. त्यांनीच मला अनुग्रह देऊन उपदेशदीक्षा दिली आहे. त्यांच्या कृपेनेच मला ही वाचासिद्धी मिळाली आहे. अशी ही माझी वाक्‌सिद्धी अता गुरुवचनाचें वैय्यर्थ्य करण्याकरिता तुम्ही प्रवर्तित करीत आहा तर आता त्या पापाचें फळ भोगण्यास तयार व्हा! श्रीगुरूंनी म्हटलें आहे 'पुत्र' म्हणून, मी म्हटले आहे 'पुत्री' म्हणून तर आता दोन्ही म्हणणी विफल ठरतील व तुला संतान नपुंसक होईल. " एवढे बोलून लगेच तो सिद्ध पुरुष तेथून

निघून गेला. पुढे त्या सिद्धपुरुषाच्या म्हणण्याप्रमाणे चन्द्रसेन जाधव यांना रामचन्द्र नामक संतान झाले पण हें संतान नपुसक झाले. काही वर्षानंतर पुन्हा एकदा भालकी ' या चन्द्रसेन जाधवांच्या राजधानीस त्यांचे गुरु भांस्करराय सहजगत्या आले असता आपल्या अपत्यकलत्रासह चन्द्रसेन त्यांच्या दर्शनास गेले. चन्द्रसेनाचा तनय पाया पडू लागला असता गुरुमहाराजांना तो नपुसक लक्षण युक्त दिसताच मोठ्या आश्चर्याने त्यांनी विचारले की हें काय ?" तेव्हां चन्द्रसेनाला स्वतःच्या अपराधाची लाज वाटून तो म्हणाला की नारायणदेवांच्या शापवाणीचा हा परिणाम आहे आणि असे सांगून तो पुन्हा श्रीगुरुचरणाना शरण गेला. कृपासागर गुरुराज भास्करांना चंन्द्रसेनाच्या अपराधाची जाणीव होऊन देखील स्वतःच्या वचनाचें अमोघत्व रक्षण करण्यासाठी ते रामचंद्र जाधवाला स्वतः बरोबर घेऊन निघाले. रामचंद्र जाधवाला पौरुषप्राप्ती व्हावी म्हणून ते मूलहृद ' नांवाच्या पुण्यक्षेत्रात जाऊन राहिले. या मूलहृद ' नांवाचे सध्या कन्नड भाषेत " मुलीमडू " असे नाव पडले आहे. हे क्षेत्र प्रसिद्ध कृष्णानदीच्या काठावर वसले आहे. तेथे कृष्णेच्या पात्रात तृचार्घ्यदान व अनुष्ठानाला त्यांनी आरंभ केला. आपल्या निवास स्थाना-पासून दूरव असणान्या कृष्णाप्रवाहापर्यंत पायी चालावे लागल्यामुळे त्यांच्या पायाला भेगा पडून जखमा झाल्या होत्या. तेव्हा पाय चेपून देणाऱ्या गुरुमहाराजांच्या शिष्यांनी त्यांना प्रार्थना केली की कृष्णाकाठीच आश्रम करून त्यात राहाणे फार बरे होईल. तेव्हां त्यांची तशा प्रकारची विनंती ऐकून गुरुमहाराज विनोदाने म्हणाले की मला कृष्णाकाठी आश्रम बांधून त्यात राहावयास जा असे सांगण्या ऐवजी माझ्या सध्याच्या निवास स्थानाजवळच कृष्णेचा प्रवाह किंवा कृष्णेचे पात्र आणा अशी का नाही प्रार्थना करीत ?" असे उत्तर ऐकून शिष्यांनी म्हटले की " समर्थ श्रीचरणांना ते करणे कठीण नाही." हे शिष्यांचे प्रत्युत्तर ऐकून यदृच्छेने राहात्या घराजवळच कृष्णानदीचा प्रवाह आणण्यासाठी प्रतिज्ञा करून गुरुराज भास्कर दुसऱ्या दिवशी सकाळ होताच तेथेच आसन ठोकून सूर्याला हवन करू लागले. लगेच पुढे पुढे आविर्भूत होणाऱ्या गगनदीपक भास्कराला भूचर भास्कर म्हणाले, " हे भगवन् ! हे जगत्पालक ! रामचंद्र जाधवाला पौरुष प्राप्ती व्हावी या उद्देशाने मी कृष्णानदीच्या प्रवाहात तृचार्घ्यदान व अनुष्ठान आरंभिले पण येथून या माझ्या निवासस्थानापासून कृष्णा प्रवाह फार दूर आहे तरी आता माझ्या अनुष्ठानाची पूर्ती व्हावी म्हणून येथेच माझ्या निवासस्थानाच्या अगदी जवळच कृष्णेचा प्रवाह आपण आणावा हे बरे. खरोखरी हे अनुष्ठान मी तुमच्या प्रीतिखातर आरंभिले आहे. तर मला सुकरता लाभावी म्हणून हे काम आपल्या कर्तव्यात वसते असे समजून मी आपणासच त्रास देत आहे ! हे ऐकून रविराज म्हणाले, पंडितश्रेष्ठा, उपासकश्रेष्ठा, आपणास हे माहीत नाही का की भगवान् हिरण्यागर्भाचा काय बरे संकल्प आहे ! सृष्टी निर्मितीच्या वेळी ज्या ज्या नद्यांचे जे जे मार्ग निश्चित

झाला आहे त्या त्या नद्यांनी त्याच त्याच मार्गांनी जावयास हवे. त्या मार्गांचा बदल करणे कठीण कर्म आहे. आणि जर का रामचंद्र जाधवाची पौरुष प्राप्ती हेच एक आपले अभीष्ट असेल तर ते काम मी एका पापणी लवण्याच्या आंत साधून देतो, त्या करिता तृचार्घ्यदान, अनुष्ठान आणि कृष्णेच्या प्रहावाचा बदल घडविणे हे मुळीच आवश्यक नाही. सूर्याचे हे बोलणे ऐकून गुरुराज भास्कर क्रोधाविष्ट होऊन म्हणाले,, " सूर्या, अरे तू मला काय एक भिकारी समजतोस ? रामचंद्र जाधवाची पौरुषप्राप्ती मला स्वसामर्थ्ये करून मिळवणे शक्य नाही असे का तुला वाटते ? आगंतुक दोष आगंतुक उपायानेच घालवावा ही माझी इच्छा ! तर आता या जगात सूर्योपासनेचा मार्ग चिरंतन टिकवू इच्छित असशील तर माझे अनुष्ठान सुकर व्हावे म्हणून कृष्णेचा प्रवाह आता इकडे आणवून घे. असे होणे नसेल तर नानाप्रकारच्या उपायांनी तुझा उपासनामार्ग सर्वस्वी या जगातून कसा निर्मूलन होऊ शकेल हे पाहाणे हेच माझे मुख्य प्रयत्नांचे कर्तव्य ठरेल ! करणे, न करणे किंवा वेगळे काही करणे, न करू शकणाऱ्या असमर्थांच्या उपासनेचे खंडण करणेच योग्य ठरेल ! "

भास्कररायांचे बोलणे ऐकून व्याकुळ झालेला अंशमाली सूर्य श्रीभास्कर-रायांच्या जीवितावधीचा विचार करून कृष्णामार्गाच्या प्रवाहाचे परिवर्तन घडवून आणण्यास तयार झाला. भास्करानेही ठीक ठीक असे म्हणत या प्रवाह परिवर्तनाचा अंगिकार केला. नंतर तृचार्घ्यदान व अनुष्ठानाने रामचंद्राचे पौरुष त्यास प्राप्त झाले. श्रीभास्कररायांच्या जीवनकालातच त्या वनाच्या मध्यभागातून कृष्णेचा मार्गप्रवाह सुरूझाला तो झालाच ! आजही वनाच्या मध्यभागीचे वाळवंट पाहून अजाण त्या लोकांना मोठे आश्चर्य वाटत असते. चन्द्रसेन जाधवानें मात्र ते 'मूलहृद' किंवा मुलीमड़ हे गाव श्री भास्कररायांना समर्पित केले आणि भास्कररायांनी ते गाव तेथील विप्रजनाना आग्रहार म्हणून देऊन टाकले. तेथे पुष्कळच चिंचेची झाडे आजही आहेत. या चिंचांची सारी किंमत तेथील विप्रजनांनीच घ्यावी अशी भास्कररायांची मनीषा असावी असे वाटते. पुढे कालौघाने हे गाव निजामाच्या राज्यात दाखल झाले. आजदेखील तेथे असा समज जागृत आहे की जर का कोणी निजामराज्यातील अधिकाऱ्याने तेथील चिंचांची विक्री करून-धनार्जनाची इच्छा बाळगली, तर लगेच त्या चिंचांना कीड लागते व त्यात आळ्या उत्पन्न होतात अशी श्रीभास्करराय गुरूंची आख्यायिका तेथे जागृत आहे.

त्यानंतर श्रीभास्कररायांनी लोकोपकारार्थ तृचभास्कर ग्रंथ लिहिला. सूर्या-समवेत झालेल्या आपल्या युद्धाचे वृत्त श्रीभास्करायांनी स्वरचित श्रीगुरूस्तवनाच्या आरतीत असे लिहिले आहे की " अहंमभवं शिववद्धावेशोत्थ षडध्वाऽऽ मर्शत्यक्तक दध्वा भास्करसह युद्ध्वा ।। अशा प्रकारची ही तृचभास्कर ग्रंथ निर्मितीची माहिती आहे. अर्थात् ही माहिती श्री. डॉ. भांडारकर महोदयांच्या काळात उपलब्ध नसावी-

श्रीभास्कररायांच्या ग्रंथांची माहिती साहित्याचार्य नारायणशास्त्री खिस्ते यांनी "श्रीभास्करचरित चम्पूग्रंथांत" विस्ताराने दिलेली आहे. श्रीभास्कररायांनी समग्र भारतवर्षाचे अशाचप्रकारे पर्यटण केले होते. श्री भास्कररायांच्या देशपर्यटनात ठिकठिकाणचे लहान मोठे राजे लोक त्यांचे शिष्य बनले होते. ही माहिती श्री भास्कररायांचे शिष्य जगन्नाथ यांनी आपल्या "भास्करविलास" नामक कल्पसूत्र निबंधांत दिली आहे. त्यातील पुढील ओळ वाचनीय आहे. "यस्याऽदृष्टो नास्ति भूमंडलांशो यस्याऽदासो विद्यते न क्षितिशः" श्री भास्करराय हे माध्वमतखंडन करून श्रीशाङ्कर मताचे प्रतिष्ठापन करीत हिंडत असत असे त्यांच्या शिष्यवर जगन्नाथाने स्पष्टच म्हटले आहे. त्यामुळे काही माध्वमतानुयायी विद्वानांनी श्री भास्कररायांविषयी प्रसंगवशात् क्वचित् अनुदारतेचे उद्‌गारही प्रकट केले आहेत पण त्या वादात शिरण्याची आपणास गरज नाही कारण थोर विद्वानांचे वादविवाद आकलन करून घेण्यासाठी देखील थोर विद्वत्तेची भूमिका लागते. सर्वसामान्य जनांना त्या वादविवादांच्या अर्णवात बुडून जाण्याचीच भीती अधिक, मग हाताशी मोती लागणे दूरच ! असो.

वस्तुतः काशीक्षेत्री आल्यानंतर श्री भास्कररायांनी तेथेच देवताज्ञेनुसार ललितासहस्रनाम स्तोत्रावर सौभाग्यभास्कर नांवाचे भाष्य लिहिले. तत्पूर्वी काही थोर विद्वानांनी श्रीमच्छंकराचार्यांचे जणू अवतारच अशा पंडितांनी देखील भाष्य-लेखनाचा प्रयत्न केला पण असे म्हणतात की हट्टाने भाष्यलेखनाचा आरंभ केल्यावर त्यांची मति कुंठित झाली व डोळ्यांनाही मंददृष्टित्व आले. त्यामुळे त्यांनी श्रीललिताम्बा देवीला शरण जाऊन भाष्य लेखनाचा हट्ट सोडला व पूर्ववत् आरोग्य प्राप्त करून घेतले. अर्थात् ही एक आख्यायिका आहे. श्रीभास्कररायांनी मात्र देवतेची आज्ञा घेऊन ललितासहस्रनाम भाष्य लिहिले पण त्यांच्या प्रमाणत्वाविषयी शंका घेणाऱ्या काही काशीकर विद्वानांनी श्रीभास्कररायांची परीक्षा घेण्याची इच्छा प्रगट केली. त्यावेळच्या तेथील विद्वत्प्रमुखांतील सुप्रसिद्ध श्रीकुङ्कुमानन्द स्वामींच्या आदेशाला अनुसरून काशीकर विद्वानांनी श्रीभास्कररायांना विचारले, "आपण जर देवतेच्या आज्ञेनेच हे भाष्य लिहिले आहे तर ६४ कोटि योगिनी गणांनी सेवा केलेल्या या देवीच्या ६४ कोटी योगिनींची नांवें व चरित्रें हि आपण वर्णन करायला हवीत." हे ऐकून श्रीभास्कररायांनी त्यांच्या म्हणण्याचा स्वीकार करून त्यांना सायंतन होमानंतर गङ्गानदीवर सर्वांनी मिळून येणे करावे असे म्हटले. तेव्हा सायंकालीन अन्हिक आटोपून गंगेच्या तीरावर कैक पंडितांसह आलेल्या श्रीभास्कररायांना एका पंडिताने असे विनविले की आपण आता ६४ कोटी योगिनी गणचरित व नामकथन करावे. तेव्हा श्रीभास्करराय त्यांना उद्देशून म्हणाले की कृपया सावधानतेने आपण हे सर्व श्रवण करावे आणि असे म्हणून क्रमशः योगिनी चरित्रे सांगण्यास आरंभ केला. तेव्हा असंख्य कंठातून एकाच वेळी

असंख्य योगिनीचरित्रे ऐकणारे पंडित, श्रीकुकुमानंद स्वामीचरणांना म्हणाले की हा कसा काय चमत्कार ! की एकाच कंठातून एकाच वेळी अनेक योगिनी चरित्रे वर्णिली जात आहेत. ही पंडितांची पृच्छा व जिज्ञासा जाणून घेऊन श्रीस्वामी हसले आणि त्यांनी स्वतःच्या कमंडलूतील पाण्याने त्यांचे डोळे धुण्यास लावले. त्यामुळे ते सर्व पंडित गंगेच्या पात्रात आणि आकाशात आपापल्या वाहनातून वसलेल्या ६४ कोटि योगिनींना पाहू शकले आणि त्या सर्व योगिनी स्वतःची चरित्रे स्वतःच्याच मुखांनी वर्णन करीत आहेत असें दृश्य त्यांना दिसून आले व चमत्काराचा उलगडा त्यांना होऊ शकला. श्रीभास्कररायांच्या दक्षिण खांद्यावर श्रीललितांबा आणि डाव्या खांद्यावर श्यामलांबा वसलेली आहे असे त्यांनी स्वतःच्या डोळयांनी पाहिले. अशा प्रकारचा अत्यंत अद्‌भुत प्रकार पाहून त्या सर्व पंडितांचा गर्वपरिहार झाला. श्रीभास्करराय यांचे परदेवतात्मत्व आणि त्यांनी लिहिलेल्या ललितासहस्रनाम भाष्याचे प्रामाण्य त्यांनी खुल्या मनाने प्रतिपादन केले. अशा प्रकारे काशीकर पंडितांनी केलेली प्रशस्ती महाराष्ट्रातील संत श्रीएकनाथांनी देखील आपल्या श्रीमद्‌भागवताच्या एकादशस्कंधावरील टीकेवर मिळविली होती. काशीच्या पंडितांना ग्रंथ व ग्रंथकर्ता पटला की त्याची कीर्ती भारतभर व्हावयाचीच व अशी कीर्ती पुढे अबाधित राहावयाचीच ही जणू आपल्या भारतातील परंपराच आहे व त्यामुळे या श्रीभास्कररायांच्या भाष्याचें महत्त्व व माहात्म्य अतुल्य आहे. या ललितासहस्रनाम भाष्याच्या शेवटी "श्रीविश्वामित्रवंश्यः शिवभजनपरो भारती सोमपीथी" या श्लोकात श्रीभास्कररायांनी स्वतःच या भाष्याचा लेखनकाल विक्रमशके १७८५ असा दिला आहे. नर्मदानदीच्या उत्तरभागी विक्रमसंवत् प्रचलित असल्यामुळे व काशीक्षेत्री सौभाग्यभास्कर ग्रंथाचे लेखन झाल्यामुळे विक्रमसंवत् उल्लेखिणे योग्यच आहे. मात्र गोमांतकात सप्तकोटीश्वर क्षेत्री (सध्याच्या नारवे या प्रसिद्ध गावी) लिहिलेल्या सेतुबंध या ग्रंथांत तद्देशीय रीतीप्रमाणे शालिवाहन शके १६५५ हाच लिहिला आहे.

काशीक्षेत्रीच भास्कररायांनी सोमयाग केला हेही प्रसिद्ध आहे. तसेच काशी येथील अन्नपूर्णा मन्दिराच्या मुख्यद्वाराच्या कोपऱ्यात चक्रेश्वर नावाचे श्रीचक्रचिन्ह असलेले शिवलिङ्ग त्यांनीच स्थापिले आहे हे देखील त्यांच्या शिष्यपरंपरेत प्रसिद्ध आहे. अशा प्रकारे सर्व भारत वर्षात संचार केलेल्या भास्कररायांनी आपल्या उत्तर वयात मध्यार्जुन क्षेत्रात योगमार्गाने आपल्या देहाचे विसर्जन केले. क्रिस्ताब्द १७५० च्या नंतर त्याचे निर्याण झाले असावे, हा काळ म्हणजे बाळाजी बाजीराव पेशव्याच्या कारकीर्दीचा काळ होय आणि पेशव्याच्या भरभराटीचा काळ होय.

श्रीभास्कररायांचे असंख्य शिष्य व त्यांची परंपराहि फार मोठी पण त्या सर्वांत कौडिण्य गोत्रातील त्यांच्या पुरोहित वंशातील श्रीकालदीक्षित यांचे पुत्र गणेश दीक्षित हेच भास्कररायांचे प्रियतम शिष्य होऊन गेले. याचे दीक्षानाम

'उमापत्यानन्दनाथ' हे होय. यांचाच विद्यावंश आज देखील विद्येमुळे, तपामुळे आणि परदेवतानुग्रहामुळे विशिष्टपणे उठून दिसतो. यांच्यामुळेच आजही श्रीभास्कररायांचा संप्रदाय सुरक्षित राहिला असून वृद्धी पावतो आहे.

येथवर आपण श्रीभास्कररायांची माहिती, तपस्या, अनुष्ठान, मंत्रतंत्र प्रभुत्व, काव्यरचना, दैवी अनुग्रह, भाग्यलेखन, दैवतोपासना, घडविलेले अलौकिक चमत्कार, शिष्यपरंपरा, देशपर्यटन, काव्यलेखन व शेवटी द्वादशकलात्मक सौभाग्य भास्कर हे ललितासहस्रनामावरील त्यांनी केलेल्या भाष्याचे माहात्म्यही व त्याची अभूतपूर्व महतीही जाणून घेण्याचा यथामती प्रयत्न केला. उत्तम योद्धयाला उत्तम सारथी लाभला तर किंवा मणिकांचन योग आला तर किंवा सुवर्णसौरभ संधी लाभली तर जी अप्रतिमता, जी अतुलनीयता व जी अनन्वयता दिसून येते तोच प्रकार ललितासहस्रनामाच्या श्रीभास्करराय प्रणीत सौभाग्य भास्कर भाष्याने झाला आहे. पयसा कमलं, कमलेन पयः। पयसा कमलेन विभाति सरः। किंवा शशिना च निशा, निशया च शशी। शशिना निशयाच विभाति नभः या काव्य-पंक्तिप्रमाणें परस्परांच्या शोभेमुळे परस्परांची शोभा अधिक अधिकच प्रतीत होत जाते. भगवद्गीता व भावार्थदीपिका यांच्यामुळे सरसता का व कशी वाढते हे कसे सांगता येणार ? उत्तम शिल्पकारामुळे शिल्पनैपुण्य जाणवते की शिल्प सौंदर्याला उत्तम शिल्पकार केवळ प्रगट करीत राहातो हे कोण व कसे ठरविणार ? श्रीकृष्णाच्या सारथ्यामुळे अर्जुनाचे योद्धेपण सिद्ध झाले का अर्जुनाच्या युद्धपटुत्वामुळे श्रीकृष्णाचे सारथ्य उठावदार झाले हे कसे सांगता येणार ? कालिदासाचे काव्य समजण्यास मल्लीनाथ लाभला म्हणून कालिदास थोर का मल्लीनाथ थोर हे कसे सांगता येणार ? अशा प्रकारचा युक्तिवाद करता येईल आणि तरीही बिंवप्रतिबिंब न्यायानें बिम्ब हेच थोर कारण बिंब असल्यामुळे प्रतिबिंब दिसू शकते मग ते आदर्शाच्या माध्यमाने असो, जलाच्या माध्यमानें असो किंवा डोळयांतील पुत्तलिकेच्या माध्यमाने असो प्रस्तुत स्थळी ललितासहस्रनाम हे खरे महत्त्वाचे व अग्रभागाचे त्यानंतर सौभाग्यभास्कर ह्या भाष्याचे असीम महत्त्व ! सौंदर्य हा मूळ अलंकार व खराखुरा शोभादायी भाव. सुवर्णाचे वा रत्नांचे अलंकार सुंदर घडण-जडणीचे असतील तर मुळातील सौंदर्याची शोभा दशगुणित वा शतगुणित होईल एवढेच ! तेव्हा आतां द्वादशकलात्मक उपोद्घात नामरू प्रथम कला सोडली तर द्वितीया 'तापिनी' केलेपासून व्याख्या खऱ्याखुऱ्या प्रमाणात सुरू झाली असे म्हणता येईल. एकूण द्वादशकलेत दशशतक म्हणजे सहस्रनामावरील भाष्य लिहिलेले आहे.

या भाष्यान्तर्गत द्वादश कलांची नावे पुढील प्रमाणे आहेत.

(१) उपोद्घात प्रकरण नामक प्रथमा कला. श्लोक ५२ पर्यंत

(२) प्रथम शतकं नामक द्वितीया तापिनी कला श्लोक ८७ पर्यंत

(३) द्वितीयं शतकं नाम तृतीया धूम्रिका कला श्लोक १०२ पर्यंत
(४) तृतीय शतकं नाम चतुर्थी मरीचि कला श्लोक १२१ पर्यंत
(५) चतुर्थं शतकं नाम पंचमी ज्वालिनी कला श्लोक १३८ पर्यंत
(६) पंचम शतकं नाम षष्ठी रुचि कला श्लोक १५४ पर्यंत
(७) षष्ठम शतकं नाम सप्तमी सुषुम्णा कला श्लोक १७१ पर्यंत
(८) सप्तम शतकं नाम अष्टमी भोगदा कला श्लोक १८७ पर्यंत
(९) अष्टम शतकं नाम नवमी विश्वाख्या कला श्लोक २०३ पर्यंत
(१०) नवम शतकं नाम दशमी बोधिनी कला श्लोक २१८ पर्यंत
(११) दशम शतकं नाम एकादशी धारिणी कला श्लोक २३४ पर्यंत
(१२) ग्रन्थकृत्प्रशस्ति, फलश्रुतिः द्वादशी क्षमाख्या कला–श्लोक ३२० पर्यंत

दहा शतकांचे एक सहस्र नाम, एकूण श्लोक संख्या ३२० पृष्ठसंख्या २४० उपोद्घात प्रकरण नामक ५२ श्लोकांची पहिली कला न पाहता प्रथम शतकापासून सुरू होणाऱ्या द्वितीया तापिनी कलेपासूनच म्हणजे ५२ व्या श्लोकापासून ललितासहस्रनामाच्या पहिल्या श्लोकाचा प्रारंभ होतो. ज्या सहस्रनामाच्या भाष्यलेखकावर इतकी चर्चा झाली, त्या सहस्रनामाचा आरंभ कसा आहे ते पाहून या लेखमालेंतील पहिला लेख येथे संपविण्याचा विचार योग्य ठरेल व त्यापुढे क्रमशः श्लोक व शक्तिपातयोगरहस्याची काही उपयुक्त व सहज समण्याजोगी माहिती उद्धृत करण्याचा प्रयत्न करू. या कामात यशदायिनी श्रीललितांबादेवी स्वतःच यत्नशील आहे. पहिला श्लोक व पहिले नाम पुढीलप्रमाणे :–

–श्रीमाता श्रीमहाराज्ञीं श्रीमत्सिंहासनेश्वरीं।
चिदाग्निकुण्डसंभूता देवकार्य समुद्यता ॥ ५२ ॥

या श्लोकांत श्रीललितादेवीची पाच नावे ग्रथिलेली आहेत. १ श्रीमाता २ श्रीमहाराज्ञी, ३ श्रीमत्सिंहासनेश्वरी, ४ चिदग्निकुण्ड संभूता आणि ५ देवकार्य समुद्यता, या सर्व नामांचा वरवर दिसणारा अर्थ अगदी साधा असला, तरी प्रत्येक शब्दातील अक्षरांचे सामर्थ्य किती आहे. 'श्री' पासूनच पहिली तीन नावे का सुरू होतात? प्रथम माता, नंतर महाराज्ञी, नंतर श्रीमत्सिहानेसश्वरी हा क्रम का राखलेला आहे याचा निरनिराळ्या दृष्टिकोनातून विचार होणे अगत्याचे आहे. कारण हे नुसते काव्य, नुसते स्तोत्र व नुसते स्तवन नसून त्यात मंत्र शक्तीही आहे आणि म्हणून प्रत्येक शब्दाची समर्पकता व गूढार्थ शक्यतोवर जाणून घेणे इष्ट ठरेल. अशा दृष्टीनेच पुढील लेखातून या श्लोकांची चर्चा यथाशक्ती व यथामती करण्याचा विचार आहे.

आजच्या लेखात आलेली श्रीभास्करायांची माहिती पणशीकर शास्त्री यांच्या लेखांच्या आधाराने दिलेली आहे इति शुभम्

## —श्रीमद् विद्यारण्यस्वामीविरचित सार्थसद्गुरु प्रार्थना—

(मागील अंकावरून पुढे चालू)

## प्रार्थना अकरावी

**वासनाक्षय मनोनाश तत्त्वज्ञानाभ्यास वशात् ज्ञानरक्षा तपःसिद्धिः सर्वसमत्वं दुःखनिवृत्तिः सुखाविर्भाव इत्येतत्पञ्चप्रयोजन सिद्धिर्भूयादिती भवन्तो महान्तोऽनुगृण्हन्तु तथास्तु ॥ तथास्तु ॥ तथास्तु ॥ ६ ॥**

या अकराव्या प्रार्थनेत जीवनमुक्तीचे साधन व जीवनमुक्तीचे फल या दोनीची प्रार्थना संतांच्याजवळ केली आहे. अर्थात् या प्रार्थनेत जीवन्मुक्तीची साधने तत्त्वज्ञान--मनोनाश व वासनाक्षय ही तीन साधने व ज्ञानरक्षा-इत्यादि पांच प्रयोजने जीवन्मुक्तीची पांच फले यांची याचना केली आहे. जे पदार्थ आपल्या जवळ नसतात व ज्यांची आपणास गरज आहे त्यांचीच आपण याचना म्हणजे मागणी करीत असतो व हे सर्व ज्याच्या जवळ आहे व जो उदार दाता आहे त्याचेजवळच मागणी करीत असतो. ज्याच्याजवळ मागितलेले पदार्थ नसतात व असले तरी जे कृपण असतात म्हणजे देत नाहीत त्यांच्या जवळ मागणी करणेही व्यर्थच आहे. संताजवळ हे सर्व पदार्थ असतात व ते फार उदार असतात. म्हणून त्यांना 'महान्तः' असे म्हटले आहे. आता प्रथम ज्या जीवन्मुक्तीची साधने व फले आम्ही संतांकडे मागतो, ती जीवन्मुक्ती म्हणजे काय हे पाहिले पाहिजे. जिवंत म्हणजे प्राणधारणकरणाऱ्या अर्थात् सजीव पुरुषाला कर्तृत्व भोक्तृत्व सूखदुःखादिरूप जो चित्ताचा धर्म तो फार पीडादायक होत असतो व जोपर्यंत जीवाने चित्ताशी संबंध ठेवला आहे म्हणजे त्याच्याशी तादात्म्य मानले आहे तोपर्यंत हे चित्तधर्म त्याला पीडादायक होणारच. झोपेत चित्ताचा संबंध सुटतो, त्यावेळी जीव कसा अगदी आनंदात असतो. स्वप्नात व जागेपणी चित्ताचा संबंध आल्याबरोबर त्याला हे कर्तृत्व भोक्तृत्व व सुखदुःखादी पीडा देऊ लागते तेव्हा स्वप्नात किंवा जागेपणी यांच्या संबंधाचे निवारण करणे म्हणजेच जीवन्मुक्ती होय. झोपेत कांही काळ हा कर्तृत्वादिबंध नाहींसा होतो व स्वप्नातून जागा झाल्यावरही स्वप्नातील क्लेश आपणच नाहींसे होतात परंतु जागृती ही अवस्था अधिक राहणारी असल्याने व त्याचवेळी मनुष्याला काही पराक्रम करण्याचे सामर्थ्य असल्याने तेथेच त्याने प्रयत्न करून हे क्लेशरुपबंध नाहीसे करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे जीवन्मुक्तीचा अभ्यासकरणे होय व हा अभ्यास प्रत्येक विचारी माणसाने अहर्निश केला पाहिजे. यावर कांहीं विचारी लोक अशी शंका घेतात की, कर्तृत्वादिक्लेशरूपबंध जर चित्ताचाच धर्म असेल व अज्ञानाने तो जर साक्षीरूप

आत्म्यावर आरोपित असेल तर तत्त्वज्ञान म्हणजे आत्म्याच्या खऱ्यास्वरूपाचे ज्ञान झाले म्हणजे सहजच त्याचे अज्ञान नष्ट होऊन क्लेशरूप बंधही नष्ट होईल त्या करता पृथक् प्रयत्नाची आवश्यकता नाहीं म्हणजे आत्मज्ञानाकरताच प्रयत्न करावा म्हणजे जीवन्मुक्ती सहजच सिद्ध आहे. तिच्याकरता प्रयत्न नको. बरे चित्ताचाच हा क्लेशरूप धर्म चित्तातूनच काढून टाकण्याकरता प्रयत्न म्हणजे जीवन्मुक्तीचा प्रयत्न असे म्हणावे व तो प्रयत्न करणे योग्य होईल असे म्हणाल तर हा प्रयत्न व्यर्थ आहे. कारण धर्मीला कायम ठेवून धर्म काढणे कधीच शक्य नाहीं. पाणी तसेच कायम ठेवून त्याचा ओलावा नाहींसा करावा किंवा त्याचा पातळपणा नाहींसा करावा हे जसे असंभवनीय आहे तसे चित्त कायमठेवून त्याचा क्लेशरूपबंध नाहींसे करणे हे असंभवनीय अत एव हास्यास्पद आहे. पाण्याचा ओलेपणा व पातळपणा स्वाभाविक आहे, असे म्हणाल तर चित्ताचाबंधही स्वाभाविकच आहे मग पाण्याचा स्वाभाविक धर्म जसा स्वाभाविक असल्याने जाणार नाही तसा चित्ताचा क्लेशरूपबंध स्वाभाविक असल्याने तोही प्रयत्नाने जाणारच नाही. तेव्हां जीवन्मुक्तीचा प्रयत्न साक्षीहून बंध काढण्याचा किंवा चित्तातून बंध काढण्याचा उभयताही व्यर्थ आहे असा या विचारी लोकांचा अभिप्राय आहे. या वर सिद्धान्ती म्हणतात आपले म्हणणे योग्य आहे. साक्षी आत्मस्वरूपावर साक्षिस्वरूपाच्या अज्ञानामुळे चित्तात असलेला कर्तृत्वादिबंध आरोपित आहे त्याचे निवारण अज्ञानाच्या नाशाने होईल व त्या अज्ञानाचा नाश तत्त्वज्ञानाने होईल म्हणून तत्त्वज्ञानाकरताच मुमुक्षूने प्रयत्न करावा हे खरे आहे परंतु तत्त्वज्ञान होऊन अज्ञानाचानाश झाला तरी कांहीं काळ त्या अज्ञानाचे परिणाम शिल्लक राहातातच: जसे झाड तोडले तरी कांही काळ त्याचा ओलावा राहातोच त्याप्रमाणेच येथे समजावे. तत्त्वज्ञान व प्रारब्धकर्म हे दोनी परस्पर विरोधी नाहीत. ज्या प्रारब्धकर्माने तत्त्वज्ञान निर्माण केले त्याच प्रारब्धकर्माने सुखदु:खादि व कर्तृत्वादिबंधही राखून ठेवले असल्याने प्रारब्धकर्म संपल्याशिवाय दु:खादिबंध नष्ट होणार नाहीत, ते पीडा देत राहाणारच. चित्ताचे ते स्वाभाविक धर्म असल्याने चित्तातूनही ते काढून टाकणे शक्य नाहीं तथापी त्यांचा आत्यंतिक नाश करणे प्रारब्धकाली शक्य नसले तरी त्याचा अभिभव करणे शक्य आहे. अभिभव व नाश यात फार फरक आहे. याचे एक उदाहरण असे आहे. आपण रोज गरम पाण्याने स्नान करतो असे म्हणत असतो परंतु पाणी हे गरम कधीच होत नाही. पाणी जर खरोखरच गरम झाले असते तर ते पुन्हा: कधीही थंड झाले नसते परंतु त्यातील उष्णता

गेली की ते आम्हास थंड लागते. याचा अर्थ असा समजला पाहिजे की ज्यावेळेस ते गरम लागत होते त्या वेळीही ते थंडच होते. फक्त पाण्यात शिरलेल्या उष्णतेने त्यात थंडावा अभिभूत झाला होता म्हणजे आह्मास तो कळत नव्हता. उष्णता गेल्यावर तो भासू लागला. त्याच्या थंडाव्याच्या अनुभवास उष्णता ही अधिक असल्याने प्रतिबंधक होती. त्याचप्रमाणे जीवन्मुक्तीही पाण्याच्या गरमपणाप्रमाणे चित्ताची एक अवस्था आहे. त्या अवस्थेलाच निर्विकल्प समाधी योग, जीवन्मुक्ती अशी अनेक नावे आहेत. त्या अवस्थेत कर्तृत्वादिबंध चित्तात असले तरी त्यांचा अनुभव चित्तास म्हणजे तदुपाधिक जीवास होऊ शकत नाही कारण ते बंध जीवन्मुक्तीने अभिभूत झाले आहेत म्हणून चित्तातील स्वाभाविक बंधाचा आत्यंतिक नाश जरी करता आला नाही तरी त्याचा अभिभव करण्याकरता निर्विकल्प समाधी किंवा जीवन्मुक्ती यांचा प्रयत्न करणे योग्य आहे व त्यामुळे दृष्टदुःखादी बंधाचा प्रतिबंध व स्वरूप सुखाचा आविर्भाव अशी दोन्ही कार्ये जीवन्मुक्तीत होत असल्याने जीवन्मुक्तीचा अभ्यास करणे हे ब्रह्मात्म्यैक्य साक्षात्कारी परंतु सगुण साक्षात्कार न झालेला अकृतोपास्ती जो गौण अधिकारी त्याला आवश्यक आहे. सगुणोपासनेने सगुणसाक्षात्कार झालेला जो ब्रह्मज्ञानाचा मुख्य अधिकारी त्याला समाधीचा अभ्यास सगुणोपासनाकालीच झाला असल्याने ब्रह्मात्म्यैक्य साक्षात्कारावरोबरच जीवन्मुक्ती सिद्ध असल्याने ब्रह्मज्ञानानंतर जीवन्मुक्तीचा स्वतंत्र प्रयत्न करावा लागत नाही. अकृतोपास्ती ब्रह्मसाक्षात्काऱ्यानी जीवन्मुक्ती न साधली तरी त्याच्या विदेह मुक्तीला कोणतीही हरकत येत नाही. दोघानाही पुनजन्म नाही. परंतु त्याचे दृष्टदुःख नाहीसे होत नाही, हा विशेष आहे. प्रारब्धकर्म हे तत्त्वज्ञान्याला सुद्धा सुटत नसल्याने ते तत्त्वज्ञानापेक्षा प्रबल आहे असे कोणी म्हणत असतील तर प्रारब्धकर्मापेक्षा योगाभ्यास म्हणजेच जीवन्मुक्तीचा अभ्यास प्रबल आहे असे त्यांना उत्तर आहे. कारण प्रारब्धकर्मास हटविणारेही योगी शास्त्रात वर्णिले आहेत किंवा जीवनमुक्तीही दुःखभावपूर्वक सुखातिशयरूप असल्याने प्रारब्धकर्मातही तिचा अंतर्भाव होऊ शकतो. प्रारब्ध कर्माला फल देण्याकरिता वर्तमान कालातील प्रयत्नाची अपेक्षा आहेच. प्रारब्ध म्हणजे पूर्व जन्मकृत प्रयत्न व प्रयत्न म्हणजे इह जन्मात केलेला उद्योग. एवढेच हे दोनी परस्पर सहाय्यक आहेत. प्रारब्धाशिवाय दृष्ट प्रयत्न फळ देऊ शकत नाही व दृष्ट प्रयत्नही प्रारब्धाशिवाय फळ देऊ शकत नाही. असे हे परस्पर संबंधी पदार्थ आहेत. अल्प प्रयत्न अधिक प्रारब्ध, व

अल्प प्रारब्ध अधिक प्रयत्न. अशी उदाहरणे जगात पाहाण्यास मिळतात असो.

**जीवनमुक्तीची साधने** :—तत्त्वज्ञान, मनोनाशव व ासनाक्षय अशी तीन शास्त्रकाराती सांगितली आहेत. श्रीगुरुदत्तात्रेयानी आपल्या 'अलर्क' नावाच्या प्रिय शिष्याला

**' शृणुष्वावाहतोऽलर्क मुक्तये कारणत्रयम्**
**तत्त्वज्ञानं मनोनाशोवासनाक्षय एवच ॥ १ ॥** अशा श्लोकात तीनच साधने मुक्तीला म्हणजे जीवनमुक्तीला साधन आहेत असे सांगितले आहे. त्यात जीवनन्मुक्तीचे पहिले साधन 'तत्त्वज्ञान' हे आहे. तत्त्वज्ञानाचे स्वरूप वेदान्तादि प्रमाणांनी पुढीलप्रमाणे सांगितले आहे हे सर्व द्वैतावडंबर अद्वितीय सच्चिदानंदरूप आत्म्याच्या ठिकाणी मायेने कल्पित असल्याने शुक्तीवर कल्पिलेल्या रजताप्रमाणे खोटे आहे व हे खोटे पदार्थ निर्माण करणारी मायाही खरी नसून खोटीच आहे 'जसा यक्ष तसा त्याचा बळी' अशी म्हण आहे. एक सच्चिदानंद अद्वितीय आत्माच कल्पिताचे अधिष्ठान असल्याने परमार्थ सत्य म्हणजे वस्तुतः खरा आहे व तोच मी आहे असे निःसंशय म्हणजे अप्रामाण्य शंका किंवा निश्चय यानी रहित जे निश्चयात्मकज्ञान त्याला 'तत्त्वज्ञान' असे म्हणतात. हे ज्ञान पूर्ण विचाराने व प्रमाणाने झाले असल्याने अत्यंत दृढ असते. ते डळमळणारे नसते. असे हे ज्ञान जीवन्मुक्तीचे प्रथम साधन अथवा मुख्य-साधन आहे. या नंतर 'मनोनाश' हे दुसरे साधन आहे चैतन्यखचित अंतःकरणातून प्रमाणादि कारणांनी नानाप्रकारच्या चैतन्यखचित वृत्ती दिव्यातून ज्वाला जशा निघाव्यात तशा अंतःकरणाच्या ज्या ज्वाला त्यांनी युक्त जे अंतःकरणरूपद्रव्य ते 'मनन' म्हणजे वृत्ती निर्माण करते म्हणून त्याला 'मन' असे म्हणतात. या मनाचा नाश म्हणजे त्याचा मनपणा घालविणे म्हणजे प्रयत्नाने कोणतीही वृत्ती न उत्पन्न होण्याचा उद्योग करणे व ते मन वृत्तिरहित करणे. पाणी तरंगरहित करून निश्चल ठेवण्याप्रमाणे निर्वृत्तिक करून ठेवणे म्हणजे निरोधरूप परिणामात मन ठेवणे याला 'मनोनाश' असें म्हणतात. या मनोनाशालाच योग असे म्हटले आहे 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' असे भगवान् पतंजलीचे हे मनोनाशाविषयीचे सूत्र आहे. 'नाश' व लय यात फार फरक आहे. दुष्ट माणसाचा दुष्टपणा नाहीसा करून त्याला जिवंत ठेवून त्याच्याकडून चांगली कामे करवून घेणे हा पुरुषार्थ आहे. त्याला ठार मारून त्याच्याकडून फायदा न करून घेण्यात पुरुषार्थ नाही. जगात कोणतीही वस्तू निरुपयोगी नाही. लय म्हणजे त्याला ठार मारणे.

नाश म्हणजे त्याचे दोष घालवून त्याचा चांगला उपयोग करून घेणें असे आहे. 'णश' धातूचा अर्थ अदर्शन असा आहे-मनाला मन या रूपात न दाखविणे. काहीवेळा लय म्हणजे ठारही मारावे लागते. परंतु ते तात्कालिक फायदेशीर असते पुन: त्याची उत्पत्ती होऊन त्यापासून मग फार उपद्रव होतो. नाशात तसे नाही. नाश सर्वदा कल्याणकारकच असतो. उपद्रवकारक नाही. याप्रमाणे मनोनाशाचे संक्षेपाने निरूपण झाले.

आता तिसरे साधन 'वासनाक्षय' हे आहे. वासना म्हणजे स्थूल-पदार्थांचे सूक्ष्मरूपाने स्थूलपदार्थाच्या जागी राहाणे. कस्तुरी कापूर वगैरे सुवासिकपदार्थ काही वेळ कपडचावर ठेवून नंतर काढून घेतले तरी त्या कपडचाला त्यांचा वास येतो म्हणून कस्तुरी व कापूर यांची वासना त्या कपडयात आहे असे म्हणण्यास हरकत नाही. त्याचप्रमाणे क्रोध, शोक, लोभ, ज्ञान, इच्छा इत्यादि अंत:करणातील धर्मांचे सूक्ष्मरूपाने अंत:करणात राहणारा जो भाग त्याला वासना म्हणण्यास हरकत नाही. अंत:करणात पूर्व पूर्व अभ्यासाने त्याचे वास्तव्य झाले आहे. यालाच संस्कार असेही नाव आहे. त्या वासना चांगल्या व वाईट अशा दोन्ही प्रकारच्या असतात. चांगल्या वासना कल्याणकारण व वाईट वासना घात करणाऱ्या असतात. या वासना काहीतरी कारणाने जाग्या झाल्या म्हणजे आपापल्या क्रोधादी स्थूलरूप वृत्तीला निर्माण करतात. कोणीतरी विनाकारण आपला अपराध केला म्हणजे त्याविषयीं आपणास क्रोध येतो. हा क्रोध वासनेपासून नसून त्यानी केलेल्या अपराधापासून होतो. परंतु वर्तमानकाली अपराध नसतानाही पूर्वी केलेल्या अपराधाच्या स्मरणाने क्रोधाचा संस्कार जागृत होऊन जो क्रोधनामक वृत्ती निर्माण करतो त्या संस्काराचे नांव वासना आहे. क्रोधाचे फल हिंसा व त्याचे कारण अपकार. या उभयतांचा म्हणजे पूर्व व पर यांचा संबंध नसताच उगीच पूर्वीच्या अपराधाच्या स्मरणाने जागृत झालेली जी क्रोधाची वासना किंवा संस्कार यापासून जो चित्तात क्रोध निर्माण होतो त्याला कारण जो संस्कार त्याला वासना असे "पूर्वापरपरामर्शमंतरेण क्रोधादि वृत्तिविशेषस्य हेतुश्चित्तगत संस्कार विशेषोवासना" असे याचे व्याख्यान शास्त्राकारांनी केले आहे. येथे पूर्व म्हणजे कारण अपकारादि व अपर म्हणजे कार्य हिंसादि घेतले पाहिजे. उगीचच वसल्यावसल्या कारण व कार्य यांच्या स्मरणाने क्रोधादि वृत्ती निर्माण करणारा पदार्थ म्हणजे वासना असा या वासना शब्दाचा स्पष्टार्थ झाला. या वासनेचा क्षय करण्याचा उपाय म्हणजे विवेकाने चित्तात प्रथम स्थितीच्या वासना दृढ करणे  हाच आहे. चंचलपाणी स्थिर ठेवण्याच्या अभ्यासाचे संस्कार दृढ करीत

गेले म्हणजे ते संस्कार विपरीत म्हणजे विक्षेप संस्काराला जसे दबवितात तसे प्रशम संस्कार क्रोधादि विक्षेप संस्काराला दडपून टाकतात. त्यामुळे क्रोध उत्पन्न करणारे अपकार, अपराध वगैरे असताना देखील क्रोधादिवृत्ती उत्पन्न होणे हे या वासनाक्षयाचे स्वरूप व फल आहे असे समजावे. त्यात तत्त्वज्ञानाचे साधन श्रवण मननादि मनोनाशाचे साधन योगाभ्यास व वासनाक्षयाचे साधन विपरीत वासनोत्पादन असा येथे विवेक समजावा. तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय हे परस्परालाही कारण होतात. म्हणजे तत्त्वज्ञानानी व मनोनाशाने तत्त्वज्ञान इत्यादि प्रकारही अनेक येथे होऊ शकतात. परंतु याचा विस्तार योगवासिष्ठादि ग्रंथात केला आहे. तरी अधिक जिज्ञासूने तेथेच तो पाहावा. विस्तार-भयास्तव येथे देत नाही. या जीवनन्मुक्तीच्या साधनाच्या अभ्यासाने प्राप्त झालेल्या जीवन्मुक्तीची पाच फले या प्रार्थनेत मुमुक्षू याचकांनी सद्गुरुपाशी मागितली आहेत. त्यात पहिले फल 'ज्ञानरक्षा' हे आहे. प्रमाणाने उत्पन्न झालेल्या ज्ञानाचे रक्षण करण्याची काय गरज आहे अशी शंका करू नये. जीवन्मुक्तिरूप चित्ताची विश्रांति नसल्याने पूर्वी प्रभुरामचंद्र व परमश्रेष्ठ शुकाचार्य यांना संशय होऊन ज्ञान होऊन सुद्धा ते नसल्यासारखे झाले व निदाघ नावाच्या ऋषीला विपरीत भावनारूप विपर्यय होऊन तत्त्वज्ञानानंतरही समाधान लाभले नाही. विश्वामित्रानी प्रभुरामचंद्राला, जनकानी शुकाचार्याला व ऋभुऋषीनी निदाघाला चित्ताची विश्रांती किंवा जीवनमुक्तीचा अनुभव करवून त्यांच्या ज्ञानाचे रक्षण केले आहे. पेटलेला अग्निसुद्धा मणिमंत्र व औषधिरूप प्रतिबंधक असता दाह करू शकत नाही तसे प्रमाणजन्य ज्ञानही संशय विपर्ययरूप प्रतिबंध असता अविद्यानिवृत्यादि कार्य करू शकत नाहीत. म्हणून जीवन्मुक्तीचे प्रयोजन 'ज्ञानरक्षा' हे आहे.

'तपश्चर्या' हे जीवन्मुक्तीचे दुसरे फल आहे. तपश्चर्येने 'सर्व साध्य आहे. त्या जीवन्मुक्ताला देवही होता येते. 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' असेही सामर्थ्य जीवन्मुक्ताला येते व जीवन्मुक्ती ही मोठी तपश्चर्या आहे. मन व इंद्रियांचा निग्रह हे परम तप आहे असे शास्त्रकार सांगतात. संतांना अद्भुत चमत्कार जे दाखविता येतात ते या जीवन्मुक्तीरूप तपाच्या प्रभावानेच आहेत. संतांचे चमत्कार प्रमाणरूपनेत्र उघडून जिज्ञासूने पाहावे. एकदमच हे सर्व थोतांड आहे असा शेरा अज्ञानाने या चमत्कारावर पोरकटपणाने मारू नये. डोळे उघडून संतांची चरित्रे वाचावी. आपल्या किंमतीने त्याचा अर्थ लावण्याच्या भानगडीत शाहणा म्हणविणाराने पडू नये. असो तपश्चर्या हे दुसरे प्रयोजन जीवन्मुक्तीचे

सांगितले. जीवन्मुक्तीचे तिसरे प्रयोजन प्रार्थनेत विद्यारण्यांनी 'सर्वसमत्वं' असे लिहिले आहे व जीवन्मुक्तिविवेक ग्रंथात त्यांनी 'विसंवादाभाव' असे तिसरे प्रयोजन लिहिले आहे. दोन्हीही योग्यच आहेत. आपला अपकार करणारे व उपकार करणारे या दोहोविषयी आपलेपणाने समभाव ठेवणे हे जीवन्मुक्ताचे स्वरूपच आहे. नदीत मळ टाकणाऱ्यालाही नदी पाणी देते व तिची पूजा नमस्कार करणारालाही ती पाणी देते. दोन्ही माझीच लेकरे आहेत असा नदीचा भाव असतो. तसा जीवन्मुक्ताचाही भाव उपकारी व अपकारी यांच्याविषयी सम असतो. 'हे विश्वचि माझे' असा त्यांचा निर्धार असतो. संताची चरित्रे या दृष्टीने पाहिल्यास एकनाथ, समर्थ, तुकाराम इत्यादि जीवन्मुक्त पुरुषांची आपणाला कल्पना येईल. हा आपला व हा परका असा भिन्न भाव यांच्या चित्तात असतच नाही. या हातातील पैसे दुसऱ्या हातात घेतले तर ते आपल्या जवळच असतात. तसे आपले द्रव्य दुसऱ्यांनी घेतले तर ते आपल्याजवळच आहे असे जे समजतात त्यांनाच सर्व समत्व प्राप्त झाले असे समजावे. असे सर्वसमत्व किंवा 'द्रव्याद्वैत' हे जीवन्मुक्तीचे तिसरे फल आहे.

'आता विसंवादाभाव' हे तिसरे प्रयोजन जीवन्मुक्ती ग्रंथात सांगितले आहे. विसंवाद शब्दाचे दोन प्रकार आहेत. एक अज्ञानी म्हणजे शास्त्राध्ययन न केलेल्याशी विसंवाद व दुसरा शास्त्राध्ययन केलेल्याशी विसंवाद. शास्त्राध्ययन न केलेल्याशी जो विसंवाद त्याला लौकिक विसंवाद म्हणतात. त्याचे दोन प्रकार आहेत. एक त्याच्याशी भांडणे व दुसरा त्याची निंदा करणे. त्यापैकी क्रोधादि दोषाने रहित असणाऱ्या योग्याबरोबर कोण भांडण करण्यास येणार व कोणी आलाच तर योगी सहनशील असल्याने भागवतातील भिक्षुप्रमाणे तो सर्व सहन करीत असल्याने जमिनीवर पडलेला अग्नी जसा आपणच विझून जातो. योग्याबरोबर भांडण करणारा स्वत:च भांडण करण्याचे सोडून देतो. म्हणून योग्याबरोबर लौकिक कलह होऊ शकत नाही. दुसरा निंदारूप विसंवाद ही लौकिक योग्याविषयी होऊ शकत नाही. याचे स्वरूप कोणालाच कळत नसल्याने हा योगी निंद्य आहे की अनिंद्य आहे असा त्याचे बद्दल निंदेचाही प्रसंग येत नाही व योगी हा अंतर्मुख असल्याने बाहेरचे सर्व व्यापार त्याचे नष्ट झाले असल्याने दुसऱ्याशी भांडण किंवा दुसऱ्याची निंदा याच्याकडून होतच नाही. शास्त्रीलोकाबरोबरही योग्यांचा विसंवाद होऊ शकत नाही. कारण प्रतिवाद्यासमोर योगी आपल्या शास्त्राचे प्रमेय सिद्ध करण्यास जातच नाही. व त्याच्या शास्त्राचे प्रमेय हा दूषित करीत नाही. मग शास्त्रज्ञाशीही याचा विसंवाद घडू शकत नाही. योग्याच्या चरित्राबद्दलही

कोणी शास्त्रज्ञ विसंवाद करू शकत नाही. कारण योग्याचे चरित्र म्हणजे यमनियम आसन प्राणायामादि सर्वच शास्त्रकारानी मान्य केले असल्याने त्याच्या चरित्राबद्दल कोणीही त्याच्याशी विसंवाद करू शकत नाही. चार्वाक शास्त्रकार कदाचित योग्याशी विसंवाद करण्यास तयार होईल. परंतु योगी कोणाशीच वाद करीत नसल्याने त्याच्याशी हा विसंवादाचा प्रसंग योग्याशी नाही. म्हणून विसंवादाभावरूप जीवन्मुक्तीतील तिसरे प्रयोजन ही योग्यास संभवते. आता दुःखःनाश व स्वरूपसुखाविर्भाव ही दोन फले जीवन्मुक्तीची आहेत. परंतु जीवन्मुक्त ज्ञानी असल्याने ज्ञान झाल्याबरोबरच ही फले सिद्ध असल्याने जीवन्मुक्ती अवस्थेत त्या दोन प्रयोजनाचे अखंड रक्षण होते म्हणून ही जीवन्मुक्तीची फले आहेत असे वर्णिले आहे. ज्या प्रमाणे तत्त्वज्ञान हे जीवन्मुक्तीत सुरक्षित होते म्हणून ‘ ज्ञानरक्षा ’ हे जीवन्मुक्तीचे फल मानले. त्याप्रमाणेच दुःख निवृत्ती व सुखाविर्भाव ही दोन्ही फले जीवन्मुक्तीची मानली आहेत.

अशी साधनसहित व दंभफलरहित जीवन्मुक्ती मला होवो अशी प्रार्थना आपल्या सारख्या सत्पुरुषांच्या चरणी माझी आहे. आपली कृपा अगाध व विलक्षण सामर्थ्यशाली असल्याने ती कृपा सर्व करू शकेल. प्रार्थना ऐकून सर्व संत तसेच तुला होवो असे त्रिवार म्हणाले.



# सिद्ध दर्शन

## चैतन्य चक्रवर्ती अर्थात श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीलोकनाथतीर्थ स्वामीमहाराजांचे जीवन चरित्र

(मागील अंकावरून पुढे चालू)

बाबू चक्रवर्ती यांनी योगेश्वरचंद्र याची जन्मपत्रिका पाहिली. योगशक्तीच पुत्ररुपाने आपल्या घरात आली याची जाणीव अंतर्मनाला झाली होती. तिचा पडताळा पत्रिकेतूनही आला. त्याचा आपण विचार करू.

जन्म–पत्रिका जन्म स्थळ :– ढाका–पूर्वबंगाल. जन्म वेळ :– वैशाख शु. १२, रविवार, शके १८१४ सकाळी १०॥ वाजता. ८ मे १८९२.

हस्त नक्षत्रामध्ये, कन्याराशीत चंद्र असतांना अमृतसिद्धी योगावर व मिथुन लग्नावर जन्म झाला. स्वामींच्या कुंडलीत मिथुन लग्न असून कन्या ही जन्म राशी आहे. या दोन्ही राशी द्विस्वभाव, बुद्धीवादी व चिकित्सक म्हणून प्रसिद्ध आहेत. रवी मेषेत असून शनी सारखा तर्क व बुद्धी यांनाच प्रमाण मानणारा ग्रह चंद्र जवळ असता या योगावर जन्मणारा मनुष्य विज्ञानशाखेतील पदवीधर वा शास्त्रज्ञ होणे योग्य

होते. पण या पत्रिकेत तसे आढळत नाही. याचे कारण शुक्र लग्नी असून, मीनेचा गुरु दशमात आहे. या गुरुची सप्तम दृष्टी–शनीचंद्रावर असल्याने शास्त्रज्ञांची चिकित्सक वृत्ती घेतली. परंतु सर्व लक्ष अंतर्मुख करुन मनोवृत्तींचा व गूढशक्तींचा अनुभव घेण्याकडे पूर्णपणे वळविले. यामुळे समाधी सुखात व भक्ती मार्गात रममाण होणारा अद्वितीय सामर्थ्याचा पुरुष जन्मास आला.

ही व्यक्ती लौकिक दृष्टया प्रसिद्धीपराङ्मुख असून संन्यासाश्रम पत्करुन सर्वसंग परित्याग करणारी आहे. अध्यात्म क्षेत्रात स्वतः कृतकृत्य होऊन इतरांना प्रत्यय देणारी आहे. विशेषतः विज्ञाननिष्ठ मनोवृत्ती असलेल्यांनाही परमार्थ प्रवृत्त करण्याची विशेष शक्ती या व्यक्तीमध्ये स्पष्ट दिसत आहे. मिथुन लग्न असताना गुरु हा दोन केंद्रस्थानांचा ( सप्तम व दशम ) अधिपती असतो शनी हा भाग्येश असतो. शुक्र पंचमेश असतो. या पत्रिकेत हे तीन ग्रह केंद्रस्थानी आहेत ते परस्परांच्या दृष्टियोगात आहेत. ही स्थिती एका ग्रहाची जरी असती तरी राजयोग होत होता. परंतु तीन ग्रहांचा केंद्रस्थानाच्या अस्तित्वाने तिहेरी राजयोग झाला आहे. थोडक्यात त्रैलोक्याचे आधिपत्य या कुंडलीला लाभले आहे.

असा काहीसा ग्रहांचा वाटा अल्बर्ट आइन्स्टाईनच्या वाटयाला आल्याचे त्याच्या पत्रिकेदरून दिसते. आइन्स्टाईन हा विश्वविख्यात संशोधक. त्याच्या पत्रिकेत मिथुन लग्न आहे. दशमात शनी व भाग्यात गुरु, बुध व शुक्र यांची युती आहे. गूढ संशोधनात मग्न होण्याचा व त्यात यशस्वी होण्याचा योग दोघांच्या पत्रिकेत आढळतो. दोघांचे व्यक्तिमत्व व कार्य सर्वथा भिन्न आहे. इतर ग्रहही पुष्कळच निरनिराळे आहेत. साम्य दर्शनासाठी फक्त उल्लेख केला.

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पत्रिकेप्रमाणे स्वामींच्या पत्रीकेतही लग्न, लग्नेश, रवी व चंद्र हे पीडित आहेत. यावरून यांचे आयुष्य व यांच्या घरातील पूर्व परंपरा अल्पायुषी असल्याचे दिसते. स्वामींचे आयुष्य मात्र दैवयोगाने अपवाद ठरणारे व ग्रहयोग सामर्थ्याने भरपूर आयुष्य मिळालेले दिसते. स्वगृहीच्या बलवान गुरुची शुभ दृष्टी, षष्ठेश अष्टमात उच्चीचा व रवी उच्चीचा असल्याने अल्पायुषी परंपरेला स्वामी अपवाद ठरलें. मारकस्थानाधिपतींच्या परस्पर दृष्टियोगानेच स्वामींना साठच्या पुढचे आयुष्य लाभले. लग्नात मिथुनेचा व कन्येचा चंद्र हा आनंदी, प्रेमळ व सौम्य स्वभाव दर्शवितो. एरवी शनी चंद्र युती ही अत्यंत निराश, भित्रा व दुबळा स्वभाव बनविते पण दशमातल्या गुरुमुळे व लग्नातल्या शुक्रामुळे तत्त्वचिंतनाबरोबर विनोदी वृत्ती ही त्यांचे ठिकाणी दिसते. तसेच संगितासारख्या कलांची आवड दिसते. जर रवी राहू योग नसता व दशमावर शनीची दृष्टी नसती तर या योगावर लौकिक ज्ञानाची भौतिकशास्त्र संशोधनाची, लेखनादीची आवड निर्माण झाली असती. परंतु राहू व शनी यांचा प्रभाव रवी, चंद्र व दशमस्थान यावर झाल्याने स्वभावात एकांतप्रियता, अध्यात्मनिष्ठा व वैराग्यवृत्ती याचा उद्‌भव झाला. शुक्र लग्नी नसता

व गुरु दशमात नसता तर ही वैराग्य वृत्ती इतक्या पराकाष्ठेला गेली असती की ईश्वर अनुभवासाठी व तो आल्यानंतर आता काहीच उरले नाही या विचारांनी स्वामींनी जी एकदा हिमालयाची वाट धरली असती ती कायमचीच. पण ग्रहयोग तसा नव्हता, हे आपले भाग्य म्हटले पाहिजे. शनि व राहू यांच्या प्रभावाने श्रीस्वामीजींचे व्यक्तित्व जरी उग्र, विरक्त, तुसडे व कोणाचीही पर्वा न करणारे असले तरी, चंद्र, शुक्र व गुरु यांच्या योगाने त्यांचे अंत:करण 'मृदूनिकुसुमादपि' असे होते. सर्वांबद्दल प्रेम बाळगणारे होते. सनातन शास्त्रानुसार आश्रमानुकूल आचार तर सोडायचा नाही, कशातही मन गुंतवावयाचे नाही आणि हातून होईल तितका "वसुधैव कुटुंबकम्" या वृत्तीने प्रपंच करावा ही वृत्ती द्विस्वभाव राशींनी अनेक ग्रह व केंद्रस्थाने युक्त असल्यानेच झाली आहे.

चतुर्थेश व चतुर्थस्थान हे पीडित असून त्यात असणारे शनिचंद्र हे दोघेही मारकेश असल्याने व जन्मत: चंद्राची महादशा असल्याने जन्मापासून सात वर्षे वयापर्यंत प्रकृतीच्या अस्वास्थ्यात गेले असणार आहेत. परंतु गुरूच्या दृष्टीमुळे अध्यात्माचे बीजारोपण, म्हणजे एकांत प्रियता, विरक्तता, उदासीनत्व इ. गुण याच काळात अंकुरित झाले. चतुर्थ, अष्टम व व्यय (१२ वे) ही स्थाने अध्यात्माची समजली जातात. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या चतुर्थात रवी नेपच्युन युती चंद्राच्या केंद्रात होती. याही ठिकाणी शुक्राच्या केंद्रात असणारी शनी चंद्र युती ही कडकडीत वैराग्य निर्माण करणारी व संन्यासाश्रम घेणारी आहे. चतुर्थातले योग अनुवंशिक वारसा व संस्कार दर्शविणारे असतात या दृष्टीनेही मातापित्यांची पुण्याई यांचे ठिकाणी संक्रमित होण्यास हे योग पूरक ठरले आहेत. लौकिकदृष्ट्या मात्र चतुर्थस्थान हे मुख्यस्थान असल्याने गृह सौख्य व प्रपंच सौख्य यांना हाच योग घातक असतो. तसा अनुभव स्वामींच्या जीवनात भरपूर आहे. एके ठिकाणी स्थिर वास्तव्याने न राहू देणे हा सर्वांत मोठा अनुभव सांगता येईल. त्यामुळे प्रकृतीची तक्रार नेहमीचीच होती.

बुद्धीचा कारक बुध, ज्ञानाचा कारक गुरु व परीक्षेतील यशाचा कारक रवी असतो. स्वामींच्या जन्मपत्रिकेत तीनही ग्रह उत्तम असले तरी स्थान दृष्टीने विचार करता तृतीयेश, पंचमेश व दशमेश पीडित असल्याने स्वामींनी लौकिक शिक्षणातील अडथळे व नावड लक्षात घेऊन तिकडे पाठ फिरविली. आणि पंचमेष लग्नी असल्याने स्वत: आत्मज्ञानाचा अन्त:करणाच्या सहाय्याने अभ्यास सुरू केला असे दिसते. या दृष्टीने ग्रहांची सर्व अनुकूलता होती म्हणून गुरुप्राप्ती सहज झाली. त्यासाठी विशेष सायास पडले नाहीत. चतुर्थातील शनिचंद्राने लौकिक सुखाचे मातेरे केले. पण वैराग्यसंपन्न जीवनाने आयुष्याचे सोने केले. संतश्रेष्ठ तुकारामांच्या ग्रहांशी याबावतीत साम्य आहे. तसेच दशमातील गुरु स्वगृहीचा असल्याने अध्यात्मात सर्वकर्तृत्वाने पुढे पुढे नेत राहिला.

मंगळाच्या दशेमुळे वय वर्षे ८ ते १८ हा काळ अनेक दृष्टीनी क्लेशकारक

राहिला. प्रापंचिक विपत्तींच्या या काळात कळस केला तो वडिलांच्या मृत्यूच्या आपत्तीने ! चंद्र व मंगळ दशेचा काळ म्हणजे एका दृष्टीने वाया जाणारा काळ होय.

लाभातल्या राहूने रवी, बुध पीडित असले तरी स्वतः राहू या कुंडलीत शुभ आहे. राहू लाभस्थानात शुभ असतो. लाभेश उच्चराशीत असून त्याची लाभावर दृष्टी असल्याने राहूची दशाही शुभ असते. राहूची युती ज्या ग्रहांशी होते त्या ग्रहांचे फल एरवी जरी नष्ट करीत असली तरी जर केंद्र कोणाधिपतीपैकी एखाद्याशी शुभस्थानी अशी युती शुभ होते. या दृष्टीने रवी बुधाचे फल नष्ट झाल्यासारखे दिसले तरी दुसऱ्या दृष्टीने राहूच्या महादशेत चांगले फ‿ मिळाले आहे. वय वर्षे १५ ते ३० या काळातील योग या दृष्टीने विशेष म्हटले पाहिजेत.

वय वर्षे १६ ला राहूची महादशा सुरू झाली. गोचरीचा शनी २० व्या वर्षी जन्म रविवार आला म्हणून या काळात प्रापंचिक व लौकिक जीवनाचा निरोप घेतला गेला व नव्या दिव्य जीवनाचा आरंभ येथून सुरू झाला. राहूच्या महादशेत कष्ट, अभ्यास, मेहनत यांचा परमोच्च बिंदू गाठला असणार आहे. चंद्र, शुक्र व सप्तमेष शनीने दृष्ट असल्याने वैवाहिक, प्रापंचिक जीवनाला स्वामी स्वेच्छेने पराङमुख झाले. सामाजिक जीवनातील आकर्षणही या काळात नष्ट झालेले दिसते. या काळात घर सोडणे, संन्यास घेणे, हिमालयात एकांतात राहाणे अशा दिव्य जीवनाचा पाया घातला गेला. हा काळ जवळ जवळ अठरा वर्षांचा आहे. अग्निदिव्यातील सुवर्ण परीक्षेचा हा काळ होता.

त्या नंतर गुरूची महादशा सुरू झाली. साऱ्या अभ्यासाचे मधुर फल गुरुमहादशेत अनुभवण्यास मिळाले. स्वामींचा गुरू दशमात स्वगृहीचा आहे. दशमेश दशमस्थान आहे. तो अत्यंत बलवान असल्याने, वय वर्षे ३४ ते ५० हा काल गुरूमहादशेचा असल्याने गुरुत्वाच्या दृष्टीने सर्वश्रेष्ठ आहे. या काळात इप्सित प्राप्तीचा आनंद, भरपूर तीर्थयात्रा, गुरूपरंपरेचा वाढता व्याप, उत्तम शिष्य प्राप्ती इ. अनेक घटना या काळात घडल्या पाहिजेत असा हा काळ आहे. दशमातल्या गुरुवर शनीमहाराजांची दृष्टी नसती तर स्वभावातल्या सत्त्वयुक्त रजोगुणाचा फार मोठा अविष्कार या गुरु महादशेत दिसून आला असता. पण शनीच्या दृष्टीने गुरुत्व वृत्तीमध्ये विरक्तता, प्रसिद्धी पराङ्मुखता इ. गोष्टींचे प्राबल्य अधिक आढळते. लौकिक प्रसिद्धीचा मनस्वी तिटकारा यामुळे सर्व अनुकूल असूनही स्वामी संन्यास मार्गीय विरक्त वृत्तीचा परिपोष करीत राहिले.

वय वर्षे ५० नंतर होणारी शनीची महादशा वस्तुतः इष्टच ठरावी अशी आहे. भाग्येश चतुर्थात असणारा शनी त्याच्या महादशेत धार्मिक, अध्यात्मिक, परिपूर्णत्व देतो. यासाठी आवश्यक असा पूर्वकर्मफलभोग तोही यापूर्वी लाभल्याने त्यातील उणेपणा निःशेष झाला. अष्टमेश चतुर्थात व स्वतः पापकारक त्यामुळे या वर्षं ५० नंतरच्या कालात प्रकृती क्लेशही फार होऊन, तो स्वतः मारकेश असल्याने त्याच्या

महादशेतच ऐहिक जगाचाही निरोप घेतला गेला.

कुंडलीतील विशेष योग

१) कुंडलीतील केंद्रस्थानापैकी तीन केंद्रामध्ये शुभग्रह असून उरलेल्या (सप्तम) केंद्राचा स्वामी दशमात स्वगृहीचा असल्याने व इतर ग्रहांच्या शुभ दृष्टीमुळे ते केंद्रही बलवान झाले आहे. याप्रमाणे सर्व केंद्रस्थाने प्रभावी आहेत.

२) रवी आणि मंगळ उच्च असून गुरू स्वगृही आहे. तसेच गुरू चंद्राचा सम सप्तम योग हा ज्योतिषशास्त्र दृष्टचा "गज केसरी योग" आहे.

३) गुरू दशमात स्वगृहीचा आहे हा 'पंच महापुरुष योग' आहे. अशा स्थितीत चंद्र गुरूच्या पूर्ण सप्तम दृष्टीत असून केन्द्रात आहे. हा योग सर्वात विशेष आहे. याला 'हंस योग' म्हटले जाते.

४) लग्नाधिपती व राश्याधिपती बुध्र लाभामध्ये उच्च रवीबरोबर युती करतो हा 'बुध आदित्य' योग असून केन्द्रस्थानाचा अधिपती बुध्र असल्याने त्याला 'निपुण योग' संज्ञा आहे.

५) केंद्रातील गुरु सर्व श्रेष्ठ ग्रह असतो. इतर कोणत्याही ग्रहाचा विचार न करता केवळ या एकमेव ग्रहाने कुंडली सर्वोत्तम झाली आहे. विशेष हे की केन्द्रामध्ये गुरु असलेले प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज व प. पू. श्रीगुळवणी महाराज आहेत. या शिवाय केंद्रात गुरू असलेलेल्या व्यक्तींचा नामोल्लेख पुढील प्रमाणे आहे. प्रभुरामचंद्र, श्रीमदाद्यशंकराचार्य, श्रीसमर्थ रामदास, श्रीअक्कलकोट स्वामीमहाराज, पंडितजी सातवळेकर, आदि.

६) लग्नी शुक्र हा योग उत्तम असतो.

## योगेशचंद्राचे बालपण

योगेश अतिशय सुंदर होता. त्याचा श्यामल, आरक्त गव्हाळी रंग, सर्वांचे चित्त मोहवून टाकीत होता. नाक सरळ तरतरीत होते. कुरळया केसाचे जावळ चेहऱ्याच्या सौंदर्यात भर घालीत होते. डोळे मोठमोठे असून कमलाच्या रेखीव पाकळयांसारखे होते. जणू सारे सौंदर्य डोळयात एकवटले होते. गोवरे गोवरे गाल सुहास्य वदनाची शोभा द्विगुणीत करीत होते. अशा या बाल श्रीकृष्णासारख्या मोहक मुलाला कोण खाली ठेवणार? जो पाही तो त्याला उचलून घेई. त्याचे पटापट मुके घेई. पण योगेशला ती लगट आवडत नसे. तो लगेच रडून रडून घेणाऱ्याच्या तावडीतून सुटण्यासाठी जबरदस्त धडपड करी. सौंदर्य हा दृष्टीचा विषय आहे, कवटाळण्या चुरगाळण्याचा नाही हे ध्यानात येई व घेणारा विचारा योगेशाला मोकळा सोडी. अहाहा! मोकळा झालेला योगेश आनंदाने बेहोष होई. आनंदाच्या बेहोषीतील त्याच्या साऱ्या हालचाली व वाकुल्या पाहणाऱ्यालाही बेहोष करून टाकीत. [illegible], कविश्रेष्ठ कालीदासाच्या वर्णनाची आठवण होते.

भरतासारखा राजबिंडा अवखळ मुलगा ज्या मातापित्यांचे पोटी जन्माला आला ते पितर धन्य होत तसे योगेशचे होते.

ढाकेश्वरीचे विशाल मंदिर योगेशच्या हिंडण्याला, फिरण्याला, व खेळण्याला पुरेसे होई. तो खरा रमून जाई, ढाकेश्वरीच्या समोरच्या सभामंडपात! कितीही रडत असू दे, मंदिरात नेऊ लागले की तो शांत होई आणि त्याला ढाकेश्वरी समोर नेले तर हसू खेळू लागे. वडील पूजा किंवा आरती करीत असले की योगेशला तेथे सोडले म्हणजे झाले. तेथून कोठेही तो जाणार नाहीं की रडणार नाहीं वा कंटाळणार पण नाही. सारी पूजा, आरती पाहात बसणार. मनाशी तसे करीत बसणार. सर्व पुण्याई घेऊन ढाकेश्वरीचा कृपाप्रसाद म्हणूनच तो आला होता. याशिवाय तो दुसरे काही करीत बसला असता तरच नवल !

योगेश तैलबुद्धीचा होता. त्याची ग्रहण शक्ती असाधारण होती. पाहून ऐकून तो जास्त लवकर शिके. पाहून पाहून लहानपणीच त्याने पूजेचे तंत्र बिनचूक उचलले. ऐकून ऐकून किती तरी श्लोक योगेशने अगदी लहानपणीच मुखोद्गत केले होते. त्याच्या सर्व हालचाली, खेळ स्वतःच्या तंत्राने स्वतंत्रपणे असत. अलीकडे वाढत्या वयाबरोबर खोडचाही वाढत चालल्या होत्या. त्याचा मिस्कीलपणा चांगलाच वाढला होता. या बरोबरच लहर लागली की मंदिराच्या आवारातच रिकाम्या खोलीत जाऊन स्वारी डोळे मिटून बसून राहात असे. जेवण्याच्या वेळी आई जेव्हा मोठयाने हाक मारी तेव्हा कुठे योगेश 'आलो' 'आलो' करून बाहेर येई. एकदा तर त्याला आईची हाक ऐकूच आली नाही. इकडे आई हाक मारमारून योगेश 'ओ' देईना तेव्हा चांगलीच घाबरली. तिने मुकाटयाने हातातले काम सोडले. आणि लागली देऊळभर योगेशला शोधायला तो त्या खोलीत बसला असेल ही कल्पना नव्हती. शेवटी निराश होऊन एकदा ती खोली पाहावी म्हणून त्या खोलीत आई गेली. तर काय? योगेश नावाप्रमाणे समाधी लावून बसलेला! आईने त्याला चांगले हलविले, हाक मारली तेव्हा तो ताळयावर आला. असा प्रकार मधून मधून होत असे.

कधी कधी योगेशची चारचौघात मिसळण्याची वृत्ती पण वाढत असे. अशा वृत्तीत योगेशची विनोदी वृत्ती विशेष आढळून येत असे. योगेश तसा गंभीर प्रवृत्तीचा नव्हता. मूळ प्रवृत्ती खेळकरच होती. त्याच्या सर्व खोडया विनोदी वृत्तीमधूनच निर्माण होत होत्या. यामुळे शेजारपाजारचे एखादे गाऱ्हाणे येत असे. पण त्याचा निकाल विनोदातच लागत असे.

योगेशची मनाची ठेवण मात्र निस्पृह होती. संग्रह करण्याची त्याला बिलकूल आवड नव्हती. यामुळे लहानपणापासून शब्दाला स्पष्टता आली होती. अन्याय सहन होण्याची गोष्ट तर दूरच पण तीव्र प्रतिकार केल्या शिवाय योगेशला स्वस्थता येत नसे. न्याय अन्यायाचा निर्णय झटकन करता येत असे. ज्याची चूक त्याच्या गळयात

बांधण्यास योगेश नेहमी पुढे. या मूळ स्वभावाला माता पित्यांच्या संस्कारांनी पुष्ट व समर्थ केले होते.

ढाकेश्वरीच्या मंदिरात गोशाळा होती. मंदिराला इनामी उत्पन्न असल्याने चार जनावरांच्या खर्चाची सोय होती. वैरणकाडी घरचीच होती जागा मुबलक व धार्मिक प्रवृत्ती, म्हणून गोठा गाई वासरांनी भरलेला असावयाचा. घरात गायीचे दूध नेहमी असावयाचे. गायीच्या शेणाने सडा सारवण व्हावयाचे. योगेशला गोसेवेचे बालकडू बालपणीच मिळाले. तो गायीच्या गोठ्यात दिवसातून ४-५ वेळा तरी फेरफटका मारून येत असे. तो कालवडी गोऱ्ह्यांना खेळवील. त्यांचे खुंट्याचे दावे सोडून देईल. त्यांच्या नाचण्या-उड्या मारण्या बरोबर स्वतः नाचेल उड्या मारील. चांगला दमला म्हणजे पुन्हा दाव्यांनी त्या वासरांना खुंट्याला बांधून ठेवेल. गायींची मान, पोळी खाजवील. पाठीवर थापा मारील. चांगल्या लुसलुशीत गवताचे घास त्यांच्या तोंडात देईल. पाहाता पाहाता गायीच्या पाठीवर थाप मारून पटकन गायीच्या सडाला हात लावील. दूध येते का म्हणून सड पिळून पाहील. एक ना दोन, हजारो गोष्टी तो गोठ्यात गेल्यानंतर करीत असे. पाणी पाजणे, वैरण घालणे, शेण काढून घेणे, गवाळ आवरणे, या कामांची पण त्याला चांगलीच आवड होती. वडील धार काढण्यास निघाले की तो पळत गोठ्यात पुढे जाई व त्या त्या गाईचे वासरू सोडी. त्यावेळची गाईवासराची धावपळ पाहून योगेशचे डोळे आनंदाने भरून येत असत. मातृवात्सल्याचे इतके विलोभनीय दृश्य दुसरे सापडणे अशक्य आहे. वासरू गाईला पितांना शेपटी वर करते, पाठीमध्ये वाक आणते आणि तोंडाची हालचाल भराभर करते. हे प्रसंग तर तो एक टक पाहात उभा राही. पण योगेशची खरी तारांबळ उडे पिणाऱ्या वासराला मागे ओढताना. या रस्सीखेचीत कधी योगेश फरफटला जायचा तर कधी वासरू फरफटले जायचे. अशा वेळी आई वडिलांच्या हाताचा आधार मिळाला म्हजे योगेशचा विजय होई. भगवान गोपाल श्रीकृष्णांची आठवण तर अशा प्रसंगी होतेच पण उभयतांचे साम्य पाहिल्यावर मन आदराने व प्रेमाने नतमस्तक होते.

बाबू चक्रवर्तींच्या कुटुंबात गेल्या कित्येक वर्षांनी हा प्रथमच मुलगा झालेला असल्याने त्याचे कोडकौतुक सगळेजण करीत असत. नवसाप्रमाणे लाभलेला कालीमातेचा प्रसाद म्हणून तर जास्तच लाडका. आता हे मंदिर खऱ्याअर्थाने ढाकेश्वरी मातेचे वाटे. कारण पुत्र असेल तर माता. अआ ईशी हाक मारायला मूल पाहिजे. योगेश ढाकेश्वरीचा प्रसादपुत्र होता. आईचा सारावेळ योगेशला पाहाण्यात आणि त्यांच्या हालचालीने प्रसन्नतेत जात असे. योगेशनंतर त्याच्या मातेला एक मुलगा व मुलगी झाली. पुढे देऊळ वाडा या त्रैमूर्तीने गजबजलेला राहू लागला.

या काळात योगेशच्या प्राथमिक शिक्षणाचा प्रारंभिक टप्पा संपला होता. त्याला तासन् तास या पुस्तकी अभ्यासात लक्ष घालायला कंटाळा होता. तुमचा

गाडीभर अभ्यास असू द्या तो योगेश चुटकी सरशी संपवून टाकी. बुद्धीची कुशाग्रता त्याला मंदगती देऊच शकत नव्हती. तो अभ्यासात मागे नव्हता तसा अक्षर-लेखनातही मागे नव्हता. अक्षर इतके वळणदार होते की त्याचे शिक्षक अभिमानाने याच्या सुंदर अक्षराचा उल्लेख सर्वांपुढे सप्रमाण करीत असत. कांहींचे वळणदार अक्षर घोटून घोटून होते पण काहींचे मूळचेच वळणदार अक्षर असते. योगेशची स्थिती दुसऱ्या प्रकारातली होती.

योगेशचा व्रतबंध आठव्या वर्षी झाला. देवीच्या मंदिरात देवीसमोर व्रतबंध लागून योगेश गायत्रीच्या महामंत्राचा अधिकारी झाला. जपजाप्य अनुष्ठान पूजा या सारख्या धार्मिक विधीचा अधिकार प्राप्त झाल्याने देवीच्या पूजेची सुवर्ण संधी त्याला मिळू लागली, नित्यकर्म यथासांग करण्याकडे त्याचा विशेष कल होता. यामुळे संध्येपासून यथासांग पूजेपर्यंत आणि ब्रह्मकर्मापासून वैश्वदेवादिपूजासह यज्ञोपवीत धारणे पर्यंतची कर्मे योगेश वडीलांकडून फार अल्पावधीत शिकला. याशिवाय मंदिरात मोठमोठी धार्मिक अनुष्ठाने, यज्ञ, याग होत असल्याने योगेशच्या धार्मिक संस्काराचे कोष सतत भरत चालले. गायत्रीच्या जपानुष्ठानाने आणि सप्तशतीच्या नित्य पाठाने योगेशची हृदयस्थ महाशक्ती अतीव प्रसन्न राहू लागली.

विविध कर्मांच्या मूळाशी शास्त्रनिष्ठा असली तरी योगेशचा स्थायीभाव भक्तिप्रेमाचाच होता. या सर्व कर्मातून ठिकठिकाणच्या देव देवतांच्या स्तुतीने योगेश रोमांचित होई. आनंदाश्रूंनी डोळे भरून येई आणि अतीव भक्तिप्रेमाने कंठ दाटून येई. देवदेवतांच्या मंत्रामंत्रातून स्तुतीची भावमधुर कारंजी उसळताना पाहून त्याच्या हृदयवीणेच्या तारा संवेदनानी स्पंदित होत असत.

देवीची नित्य सायं आरती म्हणजे रोजचा छोटासा समारंभच असायचा. अनेक शहरवासीय भक्तमंडळी या आरतीला नित्येनेमाने उपस्थित असत. योगेश या आरतीमध्ये आपल्या गोड व भावपूर्ण स्वराने सारे वातावरण विद्युत्लहरींच्या संचाराप्रमाणे भारावून टाकी. ढाकेश्वरी मातेचे हे स्थान जागृत असल्याचा अनुभव सर्वांना येई. योगेश यावेळी बाह्यजगत् विसरून जाई. तन्मयतेमुळे त्याच्या स्वरात, चर्येत आणि दृष्टीत दिव्य अनुभूती झळकू लागे.

ढाकेश्वरीच्या मंदिरात भक्ताची ये जा सतत चालू असे. प्रवचन, भजन, कीर्तन इत्यादी कार्यक्रमही मधून मधून होत असत. भजनामध्ये योगेश रंगून जाई. या भजनामधून अनेक पदे, दोहे, श्लोक व चौपाये त्याला ऐकायला मिळत असत व सहज पाठ होत असत. तो स्वतः कवी लहर लागली की एकटाच भजन करू लागे. त्याचे भजन सुरु झाले की येणारा जाणारा थांबून राही. योगेश गाण्यातील भावपूर्ण पंक्ती पुन्हा पुन्हा आळवू लागला म्हणजे त्याच्या आवाजाला धार चढे. गीतामध्ये जसजसा रसपरिपोष होई तसतसा योगेशचा कंठ भरून येई. या अवस्थेतील स्वरपंक्तींनी मंदिरातील सारे वातावरण चैतन्याने भरून जाई.

गोठयात बांधलेल्या गायी अधीरतेने उठून उभ्या राहात. कान टवकारून ऐकू लागत. वासरे तर जवळपास येऊन योगेशचे गाणे शांतपणे ऐकत उभी राहात. आई, वडील, वहीण, भाऊ या गाण्याने आनंदून जात. पुढे गेले तर संकोच वाटेल म्हणून दूरून, आडून ते ऐकत उभे राहात. मातापित्याचे हृदय उचंबळून डोळयावाटे वाहू लागे.

कुलसुपूत जान्यो परौ । देखी सुभलछन गात ।।
होनहार विरवानके । होत चिकने पात ।।

मुलाचे पाय पाळण्यात दिसतात याची प्रचीती यामधून सतत येत होती.

बंगालमध्ये जशी काली उपासना विशेष आढळते त्याप्रमाणे पशुवली पद्धती ही बंगालमध्ये विशेष आढळते. ढाकेश्वरी देवीला पशुबली अर्पण करणारे भक्त काही कमी नव्हते. ही पशुवली पद्धती यज्ञातून आलेली असून कामनिक हेतूने केली जाते. यज्ञशास्त्रदृष्टया ही पद्धती निर्दोष असली तरी निष्काम पूजेला तितकी मंजूर नाही. सर्वसाधारण जनतेला आपापल्या कामना पूर्ण करून घेण्यासाठी या उपासनेची इच्छा झाली तर त्यांच्या श्रद्धेला धक्का न देता, समाजाच्या व्यापकतेची व परमेश्वराच्याही सर्व व्यापकत्वाची बुद्धी ठेवून त्यावर मौन उचित ठरेल.

ढाकेश्वरीपुढे हे बली अर्पण करण्याचे काम आजपर्यंत स्वतः बाबूजी, योगेशचे वडील करीत आले होते. त्यामुळे त्या दृश्याची सवय योगेशला लहान पणापासून झाली होती. प्रथम देवीची नेहमीप्रमाणे पूजा होते. गंध, हळद, कुंकू, पुष्प, माला अर्पण होते. आणि नैवेद्य समर्पणाचे वेळी सर्वसाधारणपणे जसे नारळ फोडले जातात तसा बळी अर्पण केला जातो. यावेळी आधी त्या पशूची पूजा, हार वगैरे घालून होते. बळी देण्याची जागा मंदिरात, देवीसमोर होती. सभामंडपाचे बाहेरील आवारात हा ओटा होता. हीच ती बलीवेदी असे. या वेदीवर पशूला बांधण्यासाठी खुंटी रोवलेली, साखळी बांधलेली व पशूला कापण्यासाठी लाकडी ओंडका ठेवलेली ठरलेली जागा असते. पशू कापण्याचे हत्यार ही मंदिरातच असे. या सर्व साधनांना हळदकुंकू फूल अर्पण केले जाते. ही सर्व तयारी झाली व देवीची पूजा झाली म्हणजे यजमान मंडळीसह पूजारी पुजेचे साहित्य घेऊन या वेदीपाशी येतात. त्या पशूला उत्तम खाद्य पदार्थांचा नैवेद्य अर्पण होऊन पुजारी शस्त्रपूजा करून पुढे होतात. तोपर्यंत माहितगार मंडळी, मग ती यजमानांचे पैकी असोत किंवा मंदिराचे परिसरातील असोत, त्या पशूला बांधून आडवे पाडतात. त्याची मान त्या लाकडी ओंडक्यावर घट्ट दाबून धरतात. पशूने मोठा आवाज वा कानाची फडफड करू नये म्हणून तोंड व कान धरून ठेवतात. मग विधिपूर्वक ते शस्त्र पशूच्या मानेवर फिरते. ढगातून चमकून जाणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे ती चमचमणारी सुरी अदृश्य होते आणि

रक्ताच्या चिळकांड्यांचा मुसळधार पाऊस धो धो वाहू लागतो. हे दृश्य योगेशने जेव्हा प्रथम पाहिले तेव्हा तो कावरावावरा झाला. त्याने आपले डोळे घट्ट मिटून घेतले. पण त्यानंतर मात्र नित्य परिचित दृश्याने डोळे निर्ढावले. मन या दृश्याबद्दल घट्ट झाले. आता या प्रकाराकडे तो निरखून, शांतपणे टक लावून पाहू लागला.

योगेशच्या वाढत्या वयाबरोबरच वडिलांचे हे काम मधून मधून त्याचे कडे येऊ लागले. त्याला पहिल्यादिवशी बळी कापताना शहारले होते – पण पुढे मात्र तसे कधीच झाले नाही. कापलेल्या बळीचे मुंडके देवीपुढे अर्पण करावयाचे व उरलेले धड प्रसाद म्हणून यजमानाला देऊन टाकावयाचे. यामध्ये हात रक्ताने भरत असत. योगेश हे कर्म प्रारब्धाने प्राप्त झालेले समजून करीत असे. " यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि " या न्यायाने हे भयंकर कर्म योगेश करीत असे.

यासारखेच आणखी एक प्रारब्धकर्म योगेशच्या जीवनात येऊन गेले. बंगाली माणसांच्या आहारात माशांचा सर्रास वापर होत असतो. हा आहार बंगाली ब्राह्मणांचाही असतो. मासे त्यांना निषिद्ध वाटत नाहीत. किमान बंगाली ब्राह्मण तरी मानीत नाहीत. योगेशच्या बाल जीवनात, दीक्षा मिळेपर्यंतच्या जीवनात' ही गोष्ट घडत आली. अज्ञानाने, परंपरेने, चालत आलेले कुलाचे दोष योगेश आपल्याही पदरी बांधीत होता. याच्या निषिध्दत्वाची जाणीव होती तरी प्रखरतेचा अभाव आणि परंपरेचा प्रभाव या निषिद्ध कर्मांना रोखून धरू शकत नव्हता. याची खटकणारी जाणीव पुढील जीवनात स्वामींनी अनेक वेळा प्रकट केली असली तरी बालजीवनात मात्र ही प्रखरता नव्हती, ही तीव्र कल्पना नव्हती. तो अत्यंत सरळ प्रवृत्तीचा असल्याने चालत आलेले, आपल्या पुढे दत्त म्हणून उभे राहिलेले काम निःसंशय मनाने करीत असे. हा सरळपणा देवापाशी लवकर रुजू होतो. कर्माचे गुणदोष त्यातील भावनेमुळे बदलत असतात. यजमान कामनापूर्ती साठी बळी देतील पण योगेश मात्र निष्काम कर्माचा पाठ गिरवीत होता. कसेही असले तरी या गोष्टी योगेशच्या बालजीवनात घडल्या हे मात्र खरे.

योगेशचे शालेय जीवन सुरू होऊन ५-६ वर्षे झाली असतील त्या काळातील एक घटना आहे. अभ्यासात योगेशचा नेहमी उत्तम क्रमांक असे. उत्तम बुद्धी उत्तम धारणा, उत्तम ग्रहणशक्ती आणि याच बरोबर उत्तम हस्ताक्षर या चतुर्विध पुरूषार्थांच्या जोरावर योगेश सदैव उत्तम गुण मिळवून उत्तीर्ण होत असे. यासाठी त्याला अभ्यासाशी झगडावे लागत नसे. अभ्यासाचे सर्व विषय त्याच्या डोक्यात तक्रार न करता गुण्यागोविंदाने येऊन राहात असत. यानेच त्या विषयांपैकी एखाद्या विषयाकडे पाठ फिरविली तर बिचाऱ्या विषयाला हिरमुसल्या चेहऱ्याने तेथेच बसून रहावे लागे. पण एखाद्या प्रसंगी जर का कोणत्याही विषयाला आवाहन केले तर त्या विषयाची योगेश पुढे उभे राहाण्याची कोण धांदल उडत असे.



त्याचे एकदा असे झाले की इतिहासाचा गृहपाठ करून आणण्यास शिक्षकांनी

योगेशच्या वर्गाला बजावले. इतिहासाचे शिक्षण कडक शिस्तीचे होते. त्यांचा गृहपाठ विद्यार्थी न विसरता करून येत. दुसऱ्या दिवशी योगेशने काही गृहपाठ करून नेला नाही. इतिहासाचा तास सुरू झाला. शिक्षक आले, न बोलता गृहपाठ पाहाण्यास सुरुवात केली. एकेकाची वही पाहात ते पुढे चालले होते. होता होता ते योगेश पाशी आले. योगेश उभा राहिला. गृहपाठ आणला नाही हे वाक्य त्याने नम्रपणे आदरपूर्वक पण निर्भयपणे उच्चारले, शिक्षक जरा स्तंभित झाले. त्या गोंडस विद्यार्थ्याला पाहून म्हणाले "काय चक्रवर्ती ?" आज जे लिहून आणावयास सांगितले ते पाठ घरी वाचले होतेस का ?

योगेशने मानेनेच होकार दिला. काय काय सांगितले आहे त्या पाठात ? सांग पाहू. आज आपली सुटका सहजासहजी दिसत नाही हे योगेशाला कळून चूकले. त्याने स्वत:ला सावरले झुकलेली मान ताठ केली. मौन वाणीला मोकळे केले. आणि वाचलेले धडे धडाधड म्हणून दाखवणे सोपे नाही. पण योगेशने ते म्हणून दाखवले. कुठलीशी दबलेली स्फूर्ती उफाळून वर आली. स्टेशनातून बाहेर पडणाऱ्या गाडीचा वेग मंद असतो. त्या मंद वेगाने योगेशने सुरवातीची ५-६ वाक्ये उच्चारली आणि त्यापुढे वाक्यावाक्याला जो वेग येत गेला तो पाहून वर्गातील मुले चकित झाली. ४ थी मधल्या छोट्या विद्यार्थ्याचे ते ओघवते भाषण ऐकून शिक्षक अवाक झाले. शब्दाशब्दामधले चढउतार, मानेचे इशारे आणि हातवारे या अभिनयामुळे योगेशचे सौंदर्य खुलले होते. भावनांच्या छटा डोळ्यामधून आणि चेहऱ्यावरील हावभावावरून स्पष्ट होत होत्या. त्या दोन पाठातील सारे प्रसंग योगेशने बिनचूक म्हणून दाखविले. राहिलेल्या विद्यार्थ्यांचे गृहपाठ पाहाण्यास शिक्षक न गेल्याने त्यांना हायसे वाटले. पण त्यापेक्षा विशेष हे की वर्गाचे सारे वातावरण बदलून गेले. शिक्षकांच्या मनावर योगेशच्या भाषणाचा प्रभाव पडला. त्या भाषणाच्या प्रवाहात ते स्वत:ला पूर्ण विसरून गेले. तास संपला तरी भाषण संपले नव्हते. सर्वजण एकाग्रतेने ऐकत होते. भाषणाचा वेग, भाषेवरील प्रभुत्व, भावनेचा जोर, अभिमानाची जोड शेवटच्या वाक्यापर्यंत तशीच टिकून राहिलेली होती. आपल्या वर्गात असा वक्तृत्व गुणसंपन्न हुशार विद्यार्थी आहे हे पाहून शिक्षकांना धन्यता वाटू लागली.

आपले भाषण संपवून योगेश खाली बसला मात्र की क्षणभर भाषणाच्या प्रवाहाने भारलेला वर्ग शांत राहिला. पण दुसऱ्याच क्षणी जो टाळ्यांचा कडकडाट वर्गात झाला त्याने सर्व शाळेला ही घटना नंतर विदित झाली. इतिहासाचे शिक्षक योगेश जवळ गेले आणि मोठ्या आनंदाने त्यांनी शाब्बास, शाब्बास म्हणत त्याची पाठही प्रेमाने थोपटली. ते वर्गातून बाहेर पडले आणि साऱ्या विद्यार्थ्यांनी आपल्या वर्गबंधू चेकौतुक आपआपल्या इच्छेनुसार त्याला कडकडून भेटून, हस्तांदोलन करून पाठ थोपटून केले. सर्वांचा गराडा त्याच्या भोवती पडला होता. तो केवळ सुहास्य वदनाने सर्वांना प्रत्युत्तर देत होता. त्या दिवसा पासून योगेश शाळेत प्रसिद्ध झाला.

शिक्षक त्याचा आदर करू लागले. या छोटयाशा पण बाळजीवनात होत असलेल्या कीर्तीचा योगेशवर काहीच परिणाम झाला नाही. प्रसिद्धीची यत्किंचित् अपेक्षा त्याच्या ध्यानीमनी नव्हती. ' रम्य ते बालपण ' असे वाटण्यासारखा हा काळ होता. आईवडिलांचे छत्र डोक्यावर होते. खेळण्या वागडण्याचा काळ मजेत चालला होता. समाजात धर्माला व मंदिराला प्रतिष्ठेचे स्थान होते. देवस्थानच्या इनामी शेतीचे उत्पन्न येत होते. योगेशचा लहानभाऊ आठ वर्षाचा झाला होता. मंदिरात पुन्हा एक मंगल कार्य या काळात झाले. छोटया भावाची मुंज झाली. आता मंगलकार्य बरेच दिवसांनी होणार असल्याने मोठया थाटामाटाने मुंज झाली. चार आठ दिवस समारंभाच्या वातावरणात निघून गेले. पुन्हा नित्याचे शांत वातावरण सुरू झाले. पण भाग्यचक्राची गतीबदलती असते. मग तो राजा असो नाहीतर चक्रवर्ती असो.

**आपत्ती आणि परिवर्तन –**

योगेश आता बारा वर्षाचा झाला होता. बाबूजींच्या मार्गदर्शनाखाली त्याची तयारी होत होती. बाबूजी काही कामानिमित्त परगावी गेले तर योगेश सारी जबाबदारी संभाळीत असे. मंदिर व्यवस्थेत तर काही उणीव पडत नसे. परंतु इतर जबाबदाऱ्यांमध्ये सुद्धा योगेशचे कर्तृत्व थिटे पडत नसे. मंदिराची इनामी जमीन होती. जमिनीत भाताचे आणि तागाचे उत्पन्न होत असे. यावर देखरेख ठेवून त्यातील सर्व व्यवहार योगेश वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून संभाळीत असे. छोटा भाऊ सुद्धा हाताशी येऊ लागला होता. मंदिर व गायी, घर व बाजारहाट इत्यादी क्षेत्रातील सांगितलेली कामे तो चांगली पार पाडू लागला. धाकटी वहीण आईच्या हाताखाली तयार होत होती. कोणाचीही सहज दृष्ट लागावी असा हा सोन्यासारखा संसार होता. इतर कोणाचीही दृष्ट लागण्या-पूर्वीच गतीमान काळाची मात्र दृष्ट या सोन्याच्या संसाराला लागली. बाबुजींची प्रकृती एकाएकी बिघडली. सुरवातीसुरवातीला या कर्त्यापुरुषाने आपल्या प्रकृतीकडे दुर्लक्ष केले. अंगात ताप असूनही नित्याचे आन्हिक चुकत नसे. ४।२ दिवसांनी का होईना पण शेतावरची चक्कर चुकत नसे. बाबुजींना हे कष्ट फार महाग पडले. त्याला त्यांचाही इलाज नव्हता. सर्व जबाबदारी एकटयावर पडलेली होती. स्वभाव कष्टाळू आणि प्रारब्ध कर्मही बलवत्तर होते. एकदा बाबूजी शेतावर गेले होते. अंगात ताप होता. पोटात अन्न नव्हते. भात तागाची शेते म्हणजे पाण्याचिखलाचे आगरच. त्या दलदलीतून जाणे येणे प्रकृतीला परवडले नाही. घरी कसेतरी येऊन पोहचले आणि दारातच चक्कर येऊन कोसळले. वेळ संध्याकाळची होती. आई व योगेश कोण पडले म्हणून पाहाण्यासाठी धावत गेले. जाता जाता कण्हण्याचा आवाज कानावर पडला. तो बाबूजींचा आवाज

ऐकून दोघे एकदम चरकले. जवळ जाऊन त्यांनी त्यांची शक्य ती सेवा केली. आधार देत देत घरात आणले. अंथरुण टाकून त्यावर त्यांना निजविले.

घराचे वातावरण बदलून गेले. घरातील आनंद मावळला. ती जागा गांभीर्याने घेतली. बावुजींचा ताप कमी जास्त होई. पण खालच्या नैसर्गिक पातळीवर फार वेळा येत नसे. त्यातच इतरही व्याधींनी उचल खाल्ली. क्षीण झालेल्या प्रकृतीला रोगाचा प्रतिकार होईना. त्यांच्या अंथरुणाजवळ योगेश नाही तर आई सतत बसून असत. जे जे शक्य होते ते ते उपाय चालू होते. सप्तशतीचे पाठ सुरू झाले. योगेशाचा धाकटा भाऊ व धाकटी बहीण भांबावलेल्या नजरेने अनेक-वेळा वडिलांच्या अंथरुणाजवळ येऊन थांबून राहात असत. त्यांना कुठेतरी नादी लावण्यासाठी काही तरी काम सांगितले जाई व ते बिचारे तेथून निघून जात असत. तिकडे त्यांचे मन लागत नसे म्हणून ती मुले पुन्हा परत येऊन उभी राहात असत. योगेशची प्रकृती मात्र एकाएकी प्रौढ आणि गंभीर झाली. त्याच्या अंतर्मनाला कठोर भविष्य कालाची मूक जाणीव होऊ लागली. आईच्या तर तोंडचे पाणीच पळाले. या भयंकर परिस्थितीच्या जाणीवेने योगेश मनाने कठोर झाला तर आई कोमल झाली. आईची ही स्थिती ध्यानात घेऊन योगेश तिची समजूत घाली. तिला धीराचा उपदेश पण करी. आपल्या घरात आजोबांचे असेच झाले होते हे पूर्वी त्याने वडिलांकडून ऐकलेले होते. अशावेळी आईला सांगून तिच्या मनाची तयारी कशी होईल पाहू लागला. योगेशचे आजोबा म्हणजे बावूजींचे वडील वयाच्या ३२–३३ व्या वर्षी अल्पशा आजाराने अल्पायुषी झाले होते. बावुजींच्या आजोबांचे आयुष्य सुद्धा ३२-३३ वर्षांचेच होते. ही अल्पायुषी परंपरा दिसते प्रारब्धापुढे मानवी प्रयत्नाचा इलाज चालत नाही. हे ऐकताना आईच्या काळजाचे पाणी पाणी होई. तिला हे दुःख आवरण अशक्य होऊन जाई. आपल्या छोट्या मुलीकडे पाहून तर ती कासाविस होई.

पण हे सारे दुःख गिळून तिने शक्य ती सर्व सेवा अविरत चालविली होती. पुन्हा आयुष्यात ही सेवा मिळणार नाही या बुद्धीने तिने रात्री झोप घेतली नाही की दिवसभर कशाची चिंता केली नाही. शेवटी व्हायचे तेच झाले. याच आजारात बावूजींनी सर्वांचा निरोप घेतला. वयाच्या अवघ्या ३२–३३ व्या वर्षी बावूजी देवाघरी गेले. चक्रवर्ती कुटुंबावरचे छत्र एकाएकी नाहीसे झाले. अर्ध्या संसारातून ते निघून गेले. योगेश मनाने कठोर झाला होता तरी अंतःकरणाने मात्र यावेळी त्याला बेचैन करून टाकले. ही अंतःकरणाची अस्वस्थता बाहेर टाकल्या शिवाय गत्यंतर नव्हते. आईच्या गळ्यात पडून त्याने आपला गळा मोकळा केला. ती लहान भावंडे सुद्धा आईच्या अंगावर पडून ओक्साबोक्सी रडली. जसजसा एकएक दिवस उजाडत गेला तसतसे दुःखाचे कढ शांत होऊ लागले. प्रारब्ध अटळ आहे. ते भोगणे हाच एकमेव उपाय त्यावर आहे. या विचाराने ही शांतता आली होती. हे कटुसत्य अनुभवाने [illegible] या दुःखी संसारात [illegible] करपून

जात होत्या. वासनेचे बीज होरपळून जात होते. तो याच सूत्रामधून सर्वांशी बोलू लागला. या नित्य विचाराने त्याने आपली मूळ स्थिती लवकर गाठली. या दुःखावर तो आरूढ झाला. सुख दुःखाचे आवेग असतात. या चित्ताच्या सागरावरील लाटा असतात. त्या विचाराने आवराव्या लागतात. या विचाराने योगेश शांत झाला.

ही प्रचंड आपत्ती जेव्हा कोसळली त्याच वेळी दुसऱ्या आपत्तीने पहिली मध्ये भर घातली. योगेशला शिक्षणाकडे पाठ फिरविण्याची पाळी आली. तरी त्याने अशा कठीण परिस्थितीमध्ये एकाएकी शाळा सोडली नाही. नियमित अनियमित करीत एक एक वर्ष पदरात पाडीत होता. त्याच्यावर तो थोरला म्हणून सर्व जबाबदारी येऊनच पडली. अशा काळात एकेक संकट एकामागून एक येत होते. मधेच दुष्काळ पडला. शेतीचे उत्पन्न मिळाले नाही. या मुलाला दाद न देणारे शेतकरी निघाले. आर्थिक परिस्थितीने तोंड फिरवले. मंदिरात देवीपुढे येणाऱ्या उत्पन्नावर भागणे हे अशक्य झाले. आणि योगेशला नोकरीचा विचार करावा लागला. हायस्कूल मध्ये शिक्षण चालू होते. इंग्रजीचे ज्ञान होऊ लागले होते. त्यावेळच्या ५ वी इयत्तेत योगेश होता. सध्याची ९ वी इयत्ता. बुद्धिमत्ता चांगली होती. शिकण्याची खूप इच्छा होती. वडील असते तर काहीच अडचण आली नसती. खूप खूप शिक्षण झाले असते. पण मग प्रारब्धाला अर्थ राहिला नसता.

आर्थिक टंचाई दूर करण्यासाठी योगेशने एका तागाच्या गिरणीत कारकुनाची नोकरी पत्करली. विदेशी ज्यूट फॅक्टरी मधे योगेश जाऊ लागला. स्वतंत्र वृत्तीला अनेक बंधनांनी जखडून टाकले. दिवसभरात मान वर करायला योगेशला फुरसत मिळेनाशी झाली. जेव्हा मान वर करता येत नाही तेव्हा मन फार हालचाल करते. कधी ते दारूण निराशेने पार खाली जाते तर कधी महत्त्वाकांक्षेने अतिशय ऊंच जाते. योगेश आशावादी होता. महत्त्वाकांक्षी होता. संकटाच्या पर्वतांना पाहून डगमगणारा तो नव्हता. उलट संकटे म्हणजे त्याच्या कर्तृत्वाची पर्वणी होय. त्याच्या मनाची अंदोलने खवळलेल्या सागराच्या प्रचंड लाटांप्रमाणे आकाशाला गवसणी घालू लागली. तो जीवनमुक्तीचा विचार करू लागला. अशा दुःखमय संसारात सुखाचा लवलेश सांपडणे अशक्य आहे हे त्याच्या मनाने पक्के घेतले. संसार सुखाचा असतो, हा भ्रम आहे याची त्याला खात्री पटली. कडू कारले कितीही साखरेत घोळले तरी ते कडूच असते, याबद्दल तो निःसंशय होता. तरीही तुपाची फोडणी आणि विविध मसाला घालून ते कडू कारले मिटक्या मारीत खाणारे असतात. थोडे नाही, फार असतात. योगेश त्यांच्यापैकी नव्हता. त्याच्या बुद्धीत गोड ते गोड होते व कडू ते कडू होते. खरे आणि खोटे यांच्यातील स्पष्ट फरक तो पाहात होता. तो इतका स्पष्ट होता म्हणून निग्रही होता व निग्रही होता म्हणून सर्वांवर मात करू शकत होता.

या काळात त्याची ढाकेश्वरीची पूजा तंत्रापेक्षा मंत्राने चाले. मंत्रापेक्षा

मनानेच चाले. तो आपल्या शुद्ध हृदयकुंडातले निर्मल जल नयनपात्रातून भरून आणी. आपल्या कष्टाचे चंदन उगाळी. उत्तमोत्तम भावसुमनांच्या ओंजळी अर्पण करी. श्वासोच्छवासाचा जप करी. पुलकित झालेल्या रोमरोमांच्या अक्षदा अर्पण करून मनाला अमन करणे हाच साष्टांग नमस्कार घाली. अशा पूजेला कधी खूप वेळ लागायचा तर कधी क्षणार्धात पूजा संपायची. तर कधी तो भावाकडं पूजा सोपवून देई. त्याचेवर ढाकेश्वरीमातेची पूर्ण कृपा होती. तिच्या भक्तिप्रेमात तो आतून धुंद असे. त्याचे सारे वागणे आतील प्रेरणेने नियंत्रित होते. त्यामुळे वागताना व बोलताना योगेश स्पष्ट असे; निश्चित असे आणि निश्चित ही असे.

बाह्यतः योगेशचे जीवन व्यवहाराला धरून चालू होते तरी आतील विचार मात्र या विरुद्ध वंड करून उठले होते. प्रपंचातील या अल्प अनुभवांनी आणि बंधनांनी त्याला विवाह न करण्याची इच्छा होऊ लागली. जन्मजात विरक्तीच्या वेलीचा यावेळपर्यंत खूप विस्तार वाढला होता. यामुळे वित्तेषणा, दारेषणा आणि लोकेषणा यांचा मागमूस ही उठला नव्हता. योगेशची ही विरक्ती संपूर्ण आयुष्यभर तर टिकलीच पतंतु जीवनाच्या शेवटच्या क्षणापर्यंत प्रखरपणे तेजस्वी राहिली. त्याच्या हृदयात एकमेव ध्यास होता तो भगवतीच्या दर्शनाचा. जिच्या शक्तीने साऱ्या विश्वाची जडण घडण होते, त्या शक्तीची ओळख व्हावी म्हणून तो शोध घेत होता. दुष्प्राप्य अशा या एकमेव मूळ तत्त्वाची प्राप्ती त्याला हवी होती हा एकच ध्यास लागला होता. त्या अनुसंधानाने तो अंतर्मनाच्या विश्वकुंजात वावरत होता. वडिलांचा मृत्यू, प्रपंचाची जवाबदारी, नोकरीचे वंधन यामुळे प्रौढपणा आणि गांभीर्य योगेशमध्ये आले होते. त्यामध्ये या मानसिक स्थितीने त्याला मूक केले. या अंतर्मुखतेने तो फार कमी वोलू लागला. त्याची अंतःस्थिती या टोकाला जात होती तर बलवान् प्रारब्धाचा ताण दुसऱ्या टोकावर पोचला होता. यामुळे अंतःकरणाची व्याकूळता वाढत होती. तो ही व्यथा देवीसमोर मोठ्या काकुळतीने प्रकट करी. कोणी आसपास नाही असे पाहून अश्रुपूर्ण डोळ्यांनी प्रार्थना करी. "आई मला रस्ता दाखव पुढे घेऊन जाणाऱ्यांची भेट करून दे. मला या सर्वांतून मुक्त कर. आई ! तुझ्या शिवाय मला कुणाचाही आधार नाही. कुणाचाही भरोसा नाही.

योगेशच्या या मनस्थितीचा अंदाज त्याच्या आईला चांगलाच आला होता. लहानपणापासूनच हा अलिप्त प्रवृत्तीचा आहे. त्याला कोणाचीही लगट आवडत नसे. तो या प्रपंचाच्या जंजाळामध्ये पडणार नाही. तो एक दिवस घर सोडून हिमालयात जाणार. याची तिला जाणीव होती. म्हणून ती त्याचेवर फार फार प्रेम करी. आपल्या प्रेमापोटी कदाचित् त्याच्या विचारात बदल झाला तर होईल, अशी तिची भावडी समजूत होती. तिने त्याला कधी विरोध केला नाही. जाणीव ठेवून त्याला आपल्या प्रेमाच्या कांचणात झाकून ठेवायचा नेहमी प्रयत्न केला.

तरीसुद्धा तिच्या आंतरिक वेदना तिला मधून मधून अस्वस्थ करीत असत. या विचार तंद्रीमध्ये ती तासन् तास बसून राही. आता योगेशचे वडील असते तर हे सहन करणे तिला शक्य होते. पण ते तर स्वर्गवासी झालेले. योगेश थोरला मुलगा. सारा संसार मध्यामध्ये तुटलेला. यापुढे तिचे विचारचक्र बंद होई आणि शून्य दृष्टीने कुठेतरी एक टक लावून ती पाहात बसे. आद्यशंकराचार्यांची आई जशी व्याकूळ होत होती तशीच ही आई व्याकूळ होत होती. त्यानंतर अशी घटना येथेच घडत होती. आपल्या आईची ही स्थिती जेव्हा योगेशच्या नजरेस पडे तेव्हा तो आईला खूप समजून सांगे. तुला दुःख देण्यासाठी मी हे करीत नाही. एकट्या माझ्याच नव्हे तर सर्वांच्या, अगदी बावुजींच्या सुद्धा सर्वांच्या सुखासाठी, परम कल्याणासाठी मी असे करण्याचे ठरवीत आहे. मला संसार करण्याची इच्छाच होत नाही. असे पाहा स्वेच्छेने जरी संसार केला तरी किती तापदायक आहे. मग अनिच्छेने केला तर केवढा अनर्थ ओढवेल याची मला चांगलीच जाणीव होते. तू ही विचार कर. असा संवाद मधून मधून चालत असे. आई आपली असाह्यता प्रकट करी. पण योगेशचा निग्रह ढळत नसे.

या काळात वंगभंगाची चळवळ सुरू झाली. संपूर्ण देशभर या चळवळीचे लोण पोहचले होते. बंगालमध्ये तर या चळवळीचे स्वरूप तीव्रच होते. महत्वाकांक्षी, क्रांतीकारी तरूण यामध्ये हिरीरीने सामील होत होते. चळवळ टिकून राहाण्यासाठी कार्यकर्त्यांनी भूमिगत कार्यकर्त्यांची यंत्रणा आखली होती. इंग्रजांची दडपशाही शिगेला पोहचली होती. इंग्रज अधिकारी रस्त्यावर गोळ्या घालून बंगाली तरुणांमध्ये दहशत निर्माण करीत होते. लाठीमार व धरपकड तर सर्वत्र चालू होती. बंगाली क्रांतिकारक सुद्धा इंग्रजी हुकुमशाहीला पुरून उरले होते. त्यांनी शाळा कॉलेजे, तालमी आखाडे, पूजा-प्रार्थना मंदिरे यामधून संघटित प्रतिकार निर्माण केला. तरुणांना आवाहन केले आणि इंग्रजांना आव्हान दिले. या संग्रामात भाग घेण्याची इच्छा योगेशच्या मनात आली. तरुण रक्त तेजाकडे लवकर खेचले जाते. सळसळत्या रक्ताला चळवळीची ओढ जबरदस्त असते. त्यातून ध्येयवादी, महत्त्वाकांक्षी तरुणांमध्ये तर ही प्रखरता विशेष आढळते. योगेश मित्रांच्या क्रांतिधारेत सामील झाला. त्याने नोकरीचा राजीनामा दिला. भूमिगत कार्यकर्त्यांमध्ये राहून चळवळीची सूत्रे हलवू लागला. त्यातही खूप अनुभव घेतले. धकाधकीच्या, अस्थिरतेच्या व लाठीकाठीच्या या जीवनात तो रमला नाही. सर्व साधारण जीवनापेक्षा हे जीवन उच्च तर असले तरी याहीपेक्षां उच्चतम जीवन असू शकते याची येथे खात्री झाली. मोठ्या ध्येयामध्ये लहान ध्येयांचा समावेश होत असतो. या उलट लहान ध्येयामध्ये मोठे ध्येय सामावू शकत नाही. याची प्रचीती या धावपळीच्या अनुभवात योगेशला आली. त्याने आपले अंग अलगदपणे चळवळीतून काढून घेतले. पुन्हा आपल्या नित्यजीवनाला प्रारंभ केला. पण या अग्निदिव्याची झळ त्याच्याही

जीवनाला चाटून गेली. असलेली नोकरी तो गमावून वसला. संकटरंपरेने कमाल मर्यादा गाठली. जणू परिस्थितीने त्याला संसाराचे आणि प्रपंचाचे दरवाजे वंद केले. प्रतिकूल प्रारब्धाने त्याच्यापुढे एकमेव रस्ता मोकळा ठेवला. तो ही त्याच रस्त्याची वाट पाहात होता. योगेशने एक दिवस मनाशी ठरविला. तोपर्यंत सर्व तयारी केली. नियतीचे खेळ जितक्या गुप्तपणे चालतात तितक्या गुप्तपणे तयारी केली. आधी सुगावा लागला तर विरोध होईल म्हणून नाही, तर विनाकारण सर्वांना आधीच दुःखी कष्टी करण्याचे कारण होईल म्हणून त्याने आपल्यामनाशिवाय कोणालाही सांगितले नाही. या काळात तो देवीपुढे एकांतात जाऊन वसे. आपली प्रार्थना तिच्यापुढे ठेवी. " आई ! आजपर्यंत जे जग दाखविलेस ते खरे नाही. खोटे आहे. मला तुझ्या ऐश्वर्याचे खरे अंतर्जगत् दाखव. ते फक्त विवेक, जागृती आणि सत्संगतीनेच दिसू शकते. तुझ्या कृपेने माझ्यात विवेक जागृती झाली आहे. पण सत्संगती शिवाय हे व्यर्थ आहे. सत्संगती शिवाय हा रस्ता चालून जाणे अवघड आहे आणि अशक्य ही आहे. मला मार्गदर्शक गुरु दाखव. आई ! तूच गुरु दाखवितेस आणि त्या गुरुकडूनच तुझे स्वरूप स्पष्ट करतेस म्हणून माझी ही प्रार्थना पुरी कर. "

त्या रात्री त्याला देवीने दृष्टांत दिला. मार्ग दाखवला. गावाच्या, घराच्या खुणा दाखवल्या आणि एका व्यक्तीचे दर्शनही दिले आणि तेथेच स्वप्न संपले. योगेश पुढे झोपला नाही. तसाच उठला आणि देवीला साष्टांग नमस्कार केला. आई भावंडाकडे निर्विकार मनाने पाहिले व हळूच दार उघडून बाहेर पडला.

# अपराधक्षमापन स्तुतिः

लेखक : पंडित आत्माराम शास्त्री जेरे, ठाणे

## श्लोक चौथा

**मया जातमात्रेण संमोहितेनगृहीतं कदाचिन्नते नाम दत्त ॥**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित्त ॥ ४ ॥**

तिसऱ्या श्लोकात मी आईच्या गर्भात असताना मला सर्व पूर्वजन्माचे ज्ञान होते म्हणजे मी पूर्वी कोणकोणत्या योनी भोगल्या, माझे आईबाप कोणकोण होते, कोणकोणत्या देशात जन्म घेतले, कोणकोणत्या काळात जन्म घेतले, तेथे काय काय वर्तन केले, हे सर्व मला आठवत होते. पूर्वीच्या एवढ्या जन्मात पुनर्जन्म चुकविणारे ईश्वर भजन मी केले नाही, हेही मला स्मरले. देवा ! आता या मातृगर्भातील भयंकर कष्टाने मला तुझे नाम घेता येत नाही तरी या अपराधाची क्षमा कर. या गर्भातील दुःखापासून मला सोडीव म्हणजे मला येथून बाहेर काढ म्हणजे मी रात्रंदिवस तुझे भजन व नामस्मरण करून पुनः जन्म न येईल असा

वागेन. अशी प्रार्थना करीत करीत मी नऊ महिने गर्भात काढले. ईश्वराने ही दया करून मला मातेच्या कष्टप्रद गर्भाशयातून बाहेर काढले, परंतु माझे दुर्दैवही असे खडतर आहे की बाहेर आल्याबरोबर मी सोऽहंचा कोऽहं झालो, म्हणजे नाना योनीत कष्ट भोगणारा नाना देहाहून वेगळा मी आहे हे विसरून मी कोण आहे हेच मला कळेनासे झाले. असे अज्ञानाचे आवरण माझ्यावर पडले. हे सुद्धा आता मी शास्त्रावर विश्वास ठेवून शास्त्रदृष्टीने बोलत आहे. गर्भात जसे नाना देहाहून मी वेगळा आहे असे प्रत्यक्षमूलकस्मरण होते तसे हे ज्ञान नाही. शास्त्र सांगते म्हणून मी बोलत आहे. पूर्वीसारखा अनुभव वा स्मरण मला नाही. तो अनुभव किंवा स्मरण या अवस्थेत म्हणजे जन्मल्याबरोबर मला जर असते तर मी जन्मभर तुझ्या भजना वाचून दुसरे कांहीच केले नसते. परंतु जन्मल्याबरोबर मी या अज्ञानाच्या आवरणाने अत्यंत मोहित झाल्यामुळे तुझे नामस्मरण करण्याकडे एकदाही माझी प्रवृत्ती होत नाही. नामस्मरण कर म्हणजे तुझे कल्याण होईल असा साधूसंताचा उपदेश साक्षात् व परंपरेने माझ्या कानावर आला आहे. परंतु माझी प्रवृत्तीच तिकडे होत नाही व झाली नाही. कोणत्याही गोष्टीचे स्मरण होणे, निश्चय होणे, व विस्मरण होणे, भगवंता! तुझ्याच हातात आहे. 'मत्तःस्मृतिर्ज्ञानमपोहनंच' असे तूच गीतेत सांगितले आहेस. तेव्हा भगवंता मी पराधीन म्हणजे अदृष्टाधीन आहे. तरी हे दयाघना या अपराधीची तू क्षमा कर. मी स्वतंत्र असून जर अपराध केला असता तर क्षमा कर असे म्हणणे अयोग्य झाले असते. मी अदृष्टाधीन म्हणजे परतंत्र आहे म्हणून या अपराधाची तू क्षमा कर. या अपराधाकडे दुर्लक्ष कर. अशी मी त्रिवार तुझ्या चरणाजवळ प्रार्थना करीत आहे. दयाघना! तू स्वतंत्र व दयासागर आहेस. या पेक्षा मी अधिक काय बोलू ॥ ४ ॥

## श्लोक पाचवा

**मया क्रीडनासक्तचित्तेन बाल्ये गृहीतं कदाचिन्नते नाम दत्त**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभो क्लिन्नचित ॥५॥**

हे दया सागर प्रभो तुझ्या कृपेने मातृगर्भातून बाहेर आलो परंतु गर्भावस्थेतील माझे ज्ञान नष्ट होऊन म्हणजे सोऽहं या ज्ञानाचा लोप होऊन कोऽहं अशी अत्यंत मूढ अवस्था मला प्राप्त झाली मनुष्याचे आयुष्य असते असे पूर्व श्लोकात वर्णन झाले. 'शतायुर्वै पुरुषः' म्हणजे शंभर वर्षे मनुष्याचे आयुष्य असते असे वरील श्रुतीच्या सिद्धान्ताने गृहीत धरले. गृहीत धरले असे म्हणण्याचे कारण शंभर वर्षे आयुष्य असणारे लोक या कलिकालात दुर्लभच आहेत. कारण शंभर वर्षे जगणारी माणसे आपल्या पाहाण्यात फार कमी येतात. कदाचित् शंभर वर्षे जगलेल्या माणसाचे मान्य केले तरी त्याचे अर्धे आयुष्य म्हणजे पन्नास वर्षे आयुष्य- निद्रा वगैरे कामातच खर्च होते. हे आयुष्य तुझे नाम घेण्यास उपयोगी पडत नाही. उरलेले आयुष्य पन्नास वर्षे आहे. त्यात बाल्य-तरुण्य व वार्धक्य अशा तीन अवस्था प्रल्हाद भक्तांनी कल्पिल्या आहेत.

त्यात कौमारावस्थेचा बाल्यावस्थेत अंतर्भाव केला आहे. म्हणजे कौमार व बाल्य मिळून बाल्यअवस्थाच धरावी. ती अवस्था जन्मापासून वीस वर्षापर्यंत आहे. म्हणजे पन्नासातील वीस वर्षे बाल्याअवस्थेत गेली. उरलेल्या तीस वर्षापैकी वीस वर्षे वार्धक्य म्हणजे म्हातारपणात गेली बाकी उरलेली दहा वर्षे यौवन म्हणजे तारुण्यावस्थेच्या वाट्याला आली. त्यापैकी बाल्यावस्थेत म्हणजे जन्मापासून वीस वर्षापर्यंत तुझे नामग्रहण माझ्याकडून झाले नाही. हे या पाचव्या श्लोकात सांगायचे आहे. सहाव्या श्लोकात तारुण्यात व सातव्या श्लोकात वार्धक्यात तुझे नामग्रहण झाले नाही असे सांगायचे आहे. आपणास जे काही ध्येय प्राप्त करून घ्यावयाचे आहे ते जोमदार अशा तारुण्यातच घेणे शक्य आहे. बाल्य व वार्धक्य या दोन्ही अवस्था ध्येय प्राप्त करून घेण्याला अयोग्यच आहेत असे भगवद्‌भक्तश्रेष्ठ अशा प्रऱ्हादाचे मत आहे व हे मत परमपूज्य प्रात:स्मरणीय भगवान् नारदांच्या उपदेशाने प्रल्हादाने ठरविले आहे. स्वत: पोरकटपणाने नाही. हेही लक्षात घेण्यासारखे आहे. गर्भात असतानाच प्रऱ्हाद नारदोपदेशाने ज्ञानी व कृतकृत्य झाला आहे हे विसरता कामा नये. नाहीतर पाचव्या वर्षीच प्रल्हादाला असा उपदेश आपल्या मित्रमंडळीना करणे अशक्य आहे म्हणूनच गुरूंच्याही आधी प्रल्हादाचे नाव घालून 'प्रल्हादनारदपराशर' अशी परम भागवतांची गणना श्रेष्ठांनी जी केली ती केली नसती. नारदांच्या वाट्याला न आलेले भाग्य प्रल्हादाच्या वाट्यास आले आहे हे लक्षात ठेवण्यासारखेच आहे. असो.

'बाल अवस्था खेल गमायो' असा मोठमोठ्या संतांचा सुद्धा सिद्धांत आहे. 'बालस्तावत्क्रीडासक्त:' असे भगवत्पूज्यपाद शंकराचार्यांनी म्हटले आहे. बाल क्रीडासक्त, तरुण तरुणीसक्त व वृद्ध चिंतामग्न असतो असे शहाणे लोक म्हणतात. तिन्ही अवस्थेत भगवद्‌भक्त किंवा भगवद्‌भक्तीरक्त होणे हजारो जन्मात संपादन केलेल्या पुण्याई शिवाय शक्य नाही. ही पुण्याई पदरी असेल तर भगवद्‌भक्तांची संगती जन्मापासूनच जीवाला लाभते व त्याच्या तीनी अवस्था पुण्यमय, कल्याणमय व भगवन्मय होतात. संगतीचा परिणाम फार मोठा आहे. मातीसारखा निर्जीव पदार्थ सुद्धा फुलांच्या संगतीने सुगंधी सर्वाभिलाषणीय असा होतो व कांदे वगैरे दुर्गंधी तामस पदार्थांच्या संगतीने संताना अग्राह्य व अनादरणीय असा होतो. मग सजीवपदार्थावर सत्संगती किंवा दुष्टसंगती यांचा परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ? प्रऱ्हादाचे महद्‌भाग्य कार्योन्मुख झाल्यामुळे गर्भावस्थेपासूनच त्याला सत्संगती लाभली व त्याच्या जन्माचे सोने झाले. त्यांनी बाल्यावस्थेत क्रीडेत आसक्ती कधीच धरली नाही. 'त्यक्त क्रीडनकोबाल:' असे त्याचे वर्णन शुकाचार्यांसारख्या संतश्रेष्ठानी केले आहे. हे दयासागरा ! देवा ! माझ्या पदरी पुण्याईचा लेशही नसल्याने व पापाचे ढीग असल्याने मला सत्संगती न लाभता दु:संगतीच मिळाली व त्यामुळे बाल्यावस्थेत मी क्रीडनासक्त झालो व केव्हाही परमपवित्र व मंगलमय

कल्याणमय असे तुझे नाम मी घेतले नाही. तरी या कायिक, वाचिक, मानसिक अपराधाची क्षमा तू कर. अशीमाझी अनन्यभावाने तुझ्या चरणी प्रार्थना आहे ॥५॥

श्लोक सहावा ६

**मयायौवने ऽज्ञानतो भोगतोषात् गृहीतं कदाचिन्नते नाम दत्त ॥**
**क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं क्षमस्वापराधं प्रभोक्लिन्नचित्त ॥६॥**

यौवन म्हणजे तारुण्य. ' यूनो भावः यौवनं. ' ईश्वर कृपेने लहानपणापासूनच जर प्रऱ्हादादिकाप्रमाणे संत्संगती लाभली तर बाह्य तारुण्य व वार्धक्य तीनी अवस्था मंगलमय, कल्याणमय व आनंदमय अशा होतात व नराचा नारायण होतो. परतु महापुरुषसंश्रय अत्यंत दुर्लभ आहे. मनुष्यत्व–मुमुक्षुत्व–व महापुरुषसंश्रय हे तीनी दुर्लभ आहेत. बाकी सर्व गोष्टी जगात सुलभ आहेत. असे ' त्रयमेवैतत् ' असा ' एव ' कार घालून भगवत्पूज्यपादांनी विवेकचूडामणी ग्रंथात दाखविले आहे. ' श्वयुवमघोनां ' अशा सूत्रात कुत्रा, तरुण व इन्द्र हे संतसंगती नसेल तर सारख्याच योग्यतेचे आहेत असे दाखविण्याकरता व्याकरणाचार्य पाणिनी महर्षीने एका सूत्रात त्यांना गोवले आहे. पाण्यात जमीन बुडाली म्हणजे उंच समान व खोल हा भेद राहात नाही. सर्व सारखेच वाटते. पाणी ओसरल्यावर हा भेद स्पष्ट दिसतो. तद्वत् अज्ञानरूप जलप्रवाहात बुडलेल्या कुत्रा,.तरुण व इंद्र यांच्यात भेद दिसत नाही. अज्ञानग्रस्त तरुणाचे, कुत्र्याचे व इंद्राचे चरित्र सारखेच असते. पशु-मनुष्य व देव हे वैलक्षण्य कनिष्ठ, मध्यम व श्रेष्ठ हे वैलक्षण्य लुप्त होऊन तिघांचेही वर्तन सारख्याच प्रकारचे असते असे त्यांच्या चरित्र वाचकाला माहीतच आहे. म्हणून तारुण्याला गद्धेपंचविशी असे म्हणतात. तरुणपणात तारुण्याला जसा भर असतो तसा अज्ञानालाही भर असतो. हे संतसंगती रहित तरुणाचे वर्णन आहे. या अज्ञान्यांच्या तारुण्यात भोग म्हणजे स्त्री इत्यादि विषयभोग व तत्साधन. असणारा अर्थ म्हणजे पैसा या दोघालाच प्राधान्य असते. धर्म व मोक्ष असे जे दोन श्रेष्ठ पुरुषार्थ आहेत ते अज्ञानपुरात बुडून गेलेले असतात. मग ते कसे दिसणार ? अशा राष्ट्राला, देशाला, नगराला किंवा घराला अर्थकामप्रधान असे म्हटले जाते. अर्थकामप्रधान राष्ट्रादिकांचा अधःपात जवळच आला आहे असे पक्के समजले पाहिजे. अशा अवस्थेतच धर्मग्लानी व अधर्माचे अभ्युत्थान म्हणजे अभिवृद्धी होत असते.अशा प्रसंगी सर्वज्ञ व सर्वशक्तिसंपन्न भगवान् उपदेशाने, संगतीने, पराक्रमाने ही अर्थकाम प्रधान प्रवृत्ती दूर करून धर्ममोक्षप्रधान प्रवृत्तीची अभिवृद्धी करीत असतो. त्यामुळे काही काळ का होईना जगात शांती नांदते. पुनः " येरे माझ्या मागल्या " या न्यायाने पूर्ववत् अर्थकामप्राधान्य सुरू होते. हा सृष्टीचा क्रमच आहे. कारण जगद्वैचित्र्याप्रमाणे कालवैचित्र्यही सर्वदा आहेच. दोनी ईश्वर निर्मितच आहेत. जगत् हे चाकाप्रमाणे असल्याने एकसारखे सर्वदा राहू शकत नाही. खालीवर होणारच. कधी सत्त्वगुण, कधी रजोगुण तर कधी तमोगुण असे

जगत् असेपर्यंत चालणारच. कारण जगत त्रिगुणात्मक आहे. निस्त्रैगुण्य झाल्यावरच शांत अवस्था सर्वदा राहणार, त्यावेळी त्रैगुण्य नाही व तत्संबंधी जगत्‌ही नाही 'सर्वं खल्विदं ब्रह्म' असेच ते स्वरूप आहे. 'सकलमिदमहंचवासुदेवः' ईश ईशितव्य व जगत् असे तेथे काहीच नाही. केवळ एक तत्त्वच आहे. हे भावनेशिवाय कळणार नाही. व 'नचाभावयत: शान्तिः' म्हणजे भावना नसेल तर शांतीही नाही. भावना अखंड नामग्रहणाशिवाय नाही. देवा! दयाघना! मी अज्ञानाने भरलेल्या या तारुण्यात भोग व तत्साधन पैसा यालाच प्राधान्य देऊन गटारीत लोळणाऱ्या डुकराप्रमाणे त्यातच मोठा आनंद किंवा परमानंद मानून अखंड शांती देणारे तुझे नांव एकदासुद्धा घेतले नाही कारण त्यावेळी मला तुझे नाव घेण्यास सवडच नव्हती. तरी देवा! आता त्याबद्दल मला पश्चाताप होत आहे म्हणून माझ्या या घोर अपराधाबद्दल मला तू क्षमा कर. तू दयासागराप्रमाणे क्षमासागर आहेस म्हणूनच तुझ्यापाशी मी क्षमा मागत आहे. ॥ ६ ॥



# माझी साधना

लेखक–डॉ. माधव पंडित मणूरकर, बार्शी

सद्‌गुरुकृपेने मिळालेले साधन मी करतो. पण मी कोण? कर्ते करविते श्रीसद्‌गुरु. ती साधना माझी असती तर ता. २१ ऑगस्ट १९७० च्यापूर्वीच मी साधनेस बसलो असतो. त्या दिवशी महाराजांची आज्ञा वा अनुज्ञा आली म्हणून मी साधनेस बसलो.

ता. २१ च्या पूर्वीच मी साधनेस बसलो असतो हे म्हणणेच निरर्थक नाही का? साधना हे नाव माहीत नसणारा मी साधना काय करणार? गावाचे नाव माहीत नाही. कुठे जायचे त्याचा पत्ता नाही. तर तिकडचा रस्ता कसा सापडणार? कोण दाखवणार?

माझी पत्नी सौ. इंदू हिच्या मनांत आले की, आपण श्रीसद्‌गुरु गुळवणी महाराजांची दीक्षा घेऊ. त्यांना गुरु करून घेऊ. हे तिच्या मनात तीव्रतेने यावयाला एक कारण घडले. माझ्या उजव्या डोळ्यात ता. १९ जुलै ९९७० रोजी संध्याकाळी एकाएकी थोडा बिघाड जाणवला. लगेच डोळ्यांची तपासणी केली. डोळ्यात आत व्हीट्रीअस द्रवात थोडा रक्तस्राव झाला होता. यावर पाश्चात्य शास्त्राप्रमाणे उपचार नाहीत. आयुर्वेदाप्रमाणे प्रयत्न करावा तर वैद्यक शास्त्राच्या मर्यादेच्या पलीकडचा हा आजार. दुसरा धोका असा की हा थोडा झालेला रक्तस्राव, जास्त होऊन डोळा पूर्णही जातो. एवढ्यावर न थांबता कदाचित दुसऱ्या डोळ्यातही रक्तस्राव [illegible] ते पाय

आधी आधी " इंग्लडचे डॉ. रोमानीस यानाही पुण्यात ते आले असता डोळा दाखविला. " त्यांनी त्यावेळी असे उद्‌गार काढले की, 'No medicine my friend, you only pray God'

श्रीसद्गुरु पुण्याकडून तुळजापुरी आले होते. आमचे नातेवाईक श्रीयुत भाऊसाहेब नखाते वकील हे तुळजापुरी ता. १० ऑगस्ट १९७० रोजी बार्शीहून जाणार होते. ते घरी आले. आम्ही उभयतांनी त्यांना आमचा मानस निवेदिला. ता. १३ ऑगस्ट रोजी ते महाराजांचे आज्ञा पत्र घेवून आले. त्यांत त्यांनी आम्हा उभयतांना ता. २१ ऑगस्ट रोजी सकाळी ६ वाजता बार्शीतील वे. शा. सं. दादाशास्त्रीजी यांचे घरी बसण्यास आज्ञा केली होती. श्री. नखाते भाऊसाहेबांनी आम्हा उभयतांचे भाग्य मोठे असे आनंदाने सांगितले. कारण त्या दिवशी महाराजांच्या गुरूंची पुण्यतिथी होती. शिवाय इतक्या लवकर विनंती केल्या केल्या महारांजांनी अनुज्ञा दिली.

त्याच वेळी मुंबईचे श्रीयुत जोशी हे येथे आले होते. साधकांनी साधनेस कसे बसावे या बद्दल त्याचे व्याख्यान झाले. आम्हास दि. २१ ला साधनेस बसावचेच होते म्हणून व्याख्यानाचा लाभ घेतला.

मी व माझी पत्नी ता. २१ ला सकाळी ५॥ ला दादाशास्त्रींच्या घरी स्नानादि सर्व पवित्र कर्तव्ये आटोपून गेलो. श्री दादांनी महाराजांच्या फोटोचे यथाविधी पूजन व अर्चन यथासांग आमचे कडून करवून घेतले. सहाला आठ मिनिटे कमी असताना आम्ही दोघे आसनावर बसलो.

हे सर्व करताना माझे मनात येई की महाराज तर पुण्यात. मी येथे बार्शीत श्रीदादाशास्त्रींच्या घरी! ते तेथून मला दीक्षा देणार! मी ती ग्रहण करणार म्हणजे काय ? असे घडेलच कसे ? या गोष्टी वैद्यक शास्त्राने, भौतिक शास्त्राने, तर्कशास्त्राने तरी विचार करून माझ्या मनास पटेना, उमजेना, किंवा काहीच बोध होईना. असो. काही का असेना आपण साधन करायचे ठरवले आहे. महाराजांनी आज्ञापत्रात लिहिले आहे तसे बसायला तर बिघडत नाही. पत्नीइच्छा प्रमाण मानून तिलाही आपण संमती दर्शवली आहेच.

मी डोळे मिटून बसलो होतो. आमचे नंतर श्रीयुत कोटलवार यांच्या मातोश्रींना दादा पूजा सांगत होते. कारण त्याही त्या दिवशीच दीक्षा घेण्याकरता आल्या होत्या. दादा त्या बाईना म्हणत होते, गडबड करू नका. अजून सहाला आठ मिनिटे कमी आहेत. पांच मिनिटे कमी आहेत. हे सर्व दादाशास्त्रींचे बोलणे मी डोळे मिटून ऐकत होतो. मला वाटले अजून सहा वाजले नाहीत. महाराज अजून पुण्यात साधनेला बसले नसतील. म्हणून आपणास कांही होत नसेल. असा विचार चालू असताना उजव्या बाजूली माकड हाडाचे आसपास चमक निघाल्या सारखे वाटले. ताठ बसल्याचा हा परिणाम असावा असा विचार आला. लगेच

माकड हाडाच्या मध्य भागी मणक्यात चमक निघाल्या सारखे जाणवले. याचेही समर्थन वरील विचाराने केले. पुन्हा डाव्या बाजूला असेच कांहीतरी झाले. पुन्हा तीच विचार मालिका. कारण मी डॉक्टर. शास्त्रीयदृष्टचा शाहानिशा करणार.

येथपर्यंतचे शास्त्र आठवले. पुढे मी चे आस्तित्व नष्ट झाले. मला मी चे जाणीवेची जाणीव झाली. त्यावेळी मी बसूनच कमरेच्या सर्व वरील शरीराचा गोल पिंगा करीत होतो. म्हणजे गोलाकार अवस्थेत मी आसनावर बसून कमरेच्या वरील सर्व भाग फिरवित होतो. नाकाने जोर-जोरात भस्त्रिका चालू होती. हात वर खाली नेऊन दोन्ही हाताने टाळ्या वाजवीत होतो. दोन्ही हाताने जोर जोरात मधनच डोक्यावर हात बडवू लागलो. एका हातात अंगठ्या होत्या. त्या आंगठ्याचा मार डोक्यावर बसू लागला. त्यामुळे मी चे आस्तित्व जाणवले. तो पर्यंत पाऊण तास होऊन गेला होता. म्हणजे पाऊणतास पर्यंत मी पूर्णतः स्मृतिहीन होतो. डोक्यावर बसणाऱ्या हाताच्या आघाताने थोडी स्वत्वाची जाणीव झाली. पण भस्त्रिका वगैरे सर्व चालू होतीच. मला आठवले; की आपण डॉक्टर आहोत. दादाशास्त्रींच्या घरी आहोत. हे सर्व असे काहीतरी करणे आपल्या प्रतिष्ठेला योग्य नाही. हे सर्व बंद करावे अशी मनात विचारांची चुणुक आली रे आली की, माझा पिंगा अधिकच जोर-जोरात चालू होई. त्याबरोबर भस्त्रिकेचा जोर व टाळ्या वाजविण्याचा जोर अशा सर्व क्रिया माझ्या इच्छा शक्तीला न जुमानता चालू झाल्या. माझा माझ्या शरीरावरचा तावाच नाहीसा झाला. मागे पडलो. उठून पुढे डोके टेकून कै. मातोश्रींना आईऽऽग म्हणून नमस्कार केला. ॐ नमः शिवाय असे काही तरी म्हणालो. आठवत नाही.

मला जाणीव नसताना ज्या ज्या क्रिया केल्या गेल्या त्या दादाशास्त्रींकडून व इतराकडून माहिती घेऊन लिहिल्या आहेत.

कुणाला वाटेल की, मी बसतांना आपणास काही तरी होणार अशा भावनेने बसलो असेन. पण नाही. ही दीक्षा म्हणजे काय आहे हे पाहावे! हळव्या मनाच्या भासाचा हा खेळ आहे का हे जाणून घ्यावे. शास्त्रीय दृष्टचा आपल्या शरीरातील निरनिराळ्या अवयवावर ज्याला कुंडलीनी म्हणतात तिचे माकड हाडातील सेंटर्सवर काय काय परिणाम घडतात? तेथून वरच्या सेंटरपर्यंत या संवेदना कशा जातात? अशा खालून जरा मेंदूकडे या संवेदना उलट प्रवाहाने जाणे शक्यच आहे का? अशा अनेक दृष्टीतून मला या दीक्षेतील सूक्ष्मतर होणाऱ्या शरीरातील परिणामांच्याकडे पाहावयाचे होते. कुठले शास्त्र जाणतो? माझी जाणीवच गेली! मी जाणणारा कोण? व काय जाणणार!

मी साधनेतून उठलो होतो त्यावेळी सात वाजून गेले होते. म्हणजे मी एक तासाच्याहीवर बसलो होतो. पण मला वाटले फार झाले तर मी १५ ते २० मिनिटे बसलो असेन. दादाशास्त्रींनी सांगितले की, साधना उत्तम झाली. मी माझे

आसन वगैरे सोडून कुठल्याकुठे गेलो होतो. हे दादांच्याकडून कळले. मी उठलो तरी माझ्या डोळ्यावरची तंद्री कायम होती. कसल्या तरी गुंगीतच मी होतो. दादांच्या प्रशंसोद्‌गाराचा माझ्या मनावर कसलाच परिणाम झाला नाही. मी घरी आलो. देवाची पूजा अर्चा केली. तीही कशाने तरी भारावलेल्या अवस्थेतच. अंतःकरणातून अजून एकांतात डोळे मिटून बसावे असे वाटे. पण दवाखाना आदि कर्तव्ये होती. दवाखान्यात गेलो. मनातून वाटे घरी पळत जाऊन पुन्हा ध्यानास बसावे. दवाखाना कधी लवकर बंद न करणारा मी, पाचला दवाखाना बंद केला. घरी आल्यावर कपडे काढून धोतर नेसले. हात पाय धुतले. मन कसे शांत झाले! मांडी घालूनच मागे पडलो. काही काल गेला असेल, तोच माडीवरील पत्र्यावर एक मोठा धोंडा पडला. सर्व पत्रे वगैरे अंगावर पडतात असा भास झाला. या जाणीवेतून किंचाळून उठलो. पूर्ण जाग आली. पाहतो तो काय धोंडा पडला नाही. आवाज झाला नाही. नवीन इमारत पडणार कशी? उमजून आले की हा सर्व भास होता. पण याने झाले मात्र एक की, माझी ध्यानास बसण्याची अंतर्यामीची जी आस होती ती पूर्ण निमाली.

आपल्या शरीरात काही क्रिया ऐच्छिक होतात व काही अनैच्छिक होत असतात. उदाहरणार्थ हात हालवणे, पाय हालवणे, डोळे मिटणे, उघडणे या क्रिया आपल्या इच्छेवर कमी, जास्त वा बंद करता येतात. श्वासोच्छ्‌वासाची क्रिया देखील काही काल ताबा ठेवून बंद वा जोरात आपण करू शकतो. पण या श्वासोच्छ्‌वासाच्या क्रियेवर तसे नियंत्रण ठेवताना आपल्या मनाची तशी तयारी आपण करतो व हा देखील ताबा काही कालच ठेवता येतो. हृदयाची क्रिया, शरीरातील पचनादि व्यापार, इतर शरीरांतर्गत घडामोडी, मेंदूचे कार्य, ही सर्व अनैच्छिक आहेत. या इंद्रियाच्या क्रिया बंद करू म्हटले तर त्या आपणास करता येत नाहीत. पण शरीरातील महत्त्वाचे इंद्रिय हृदय. याच्यावर ही आपली हुकमत चालवणारे योगी हिमालयात आहेत. ते आपले हृदय योगसामर्थ्याने बंद करू शकतात. सॅव्हील सारख्या आंग्ल वैद्यक ग्रंथकारांनी देखील आपल्या ग्रंथात हे नमूद केले आहे.

हे योग्यांचे झाले. त्यांची तपश्चर्या महान. त्यांचे शिस्तबद्ध, खडतर, व असामान्य असे जीवन. त्यांची गोष्ट निराळी. माझ्या सारख्या सामान्यापुढे प्रश्न आहे तो असा की मी दीक्षा घेतल्या दिवशीच मी माझ्या हालचाली व अंग विक्षेप मनात आणून देखील बंद करू शकत नव्हतो. उलट बंद करावे असे मनात आले की त्या जास्त होत. हे कोण करीत होते? अशी कसली शक्ती माझ्या अंगात संचारली होती? असाच वा अन्य प्रकारचा अविष्कार करण्याचे सामर्थ्य माझ्या शरीरात कोणी घातले आहे? वा भरविले आहे? अगर निर्माण करून ठेवले आहे? ते सामर्थ्य मला लाभले आहे हे निश्चित. ते सामर्थ्य पुष्कळ वेळा मला कुमक

करायला लावते. म्हणजे मी माझा श्वास घेतही नाही व सोडतही नाही. पण अशा अवस्थेत मला त्रास न होता उलट फार फार बरे वाटते. म्हणजे काय वाटते? असे विचारले तर मी असे म्हणेन की ती अनुभवजन्य व अनुपम स्थिती आहे. मी एरवी बसेन तर ते मला जाचक वाटते व शक्य होत नाही. कित्येक वेळा माझा असा श्वास रोखून मानेचा कणा व पाठीचा कणा असा ताठ व घट्ट होतो की माझे सर्व शरीर, स्नायू, हात, पाय, पाठ, पोट छाती ही सर्व त्या कण्याला आवळून टाकली आहेत व सर्व शरीर म्हणजे एक कणा वा कण्यासारखे लाकूडमय आहे असे वाटते. आठ महिन्यात एकदाच असा अनुभव आला की माझे शरीर वजनविरहित झाले व वसल्या ठिकाणी मी तसाच अधांतरी उचचला गेलो. प्रत्यक्षात मी अधांतरी होतो की नाही हे श्रीसद्‌गुरू जाणे.

जी विशिष्ट अवस्था ध्यानात होते ती एरवी करू म्हटल्याने करताच येत नाही. हे ध्यानाचे सामर्थ्य म्हणजेच ' शक्तिपात दीक्षा ' होय. मी असे मानतो की, हे शक्तिसामर्थ्य, आत्मिकबळ, आयुष्यवर्धक, जीवनात मांगल्य, निर्माण करणारी समर्थ दीक्षा आहे. " अशा समर्थ दीक्षा सेवका वक्र पाहे ' असा या सर्व भूमंडळी कोण आहे?" अशी समर्थ अवस्था प्राप्त होते. हीच ती दीक्षा. हाच श्रीसद्‌गुरूंचा त्यांनी दिलेला कृपा प्रसाद.

दीक्षा घेतल्या नंतरचा व्यावहारिक फायदा सांगावयचा झाला तर माझ्या डोळयात उणीव निर्माण झाल्यानंतर आलेली उदासीनता पार निघून गेली. पूर्वीसारख्या जोमाने आनंदाने मी व्यवहार करीत आहे. माझ्या पाठिशी दैवी शक्ती, महाराजांची कृपा, काहीही म्हणा, पण आहे. असा नकळत मनात व कृतीत आत्मविश्वास निर्माण झालेला आहे.

ध्यानात मन एकाग्र होते. मनातील व्यावहारिक चिंता, काळजी, विचार हे सर्व अविष्कार नाहीसे होतात. मन:शांती मिळते. एवढेच नव्हे तर वैद्यक शास्त्राच्या कक्षेबाहेर अशा काही तरी संवेदना शरीरात निर्माण होतात. ज्यायोगे आरोग्य टिकण्याला मदत होते. विचार, आचार यात नकळत स्वयंस्फूर्तीने फरक पडतो.

जीवनात डोळयाच्या दोषाचे संकट आले त्या संकटानेच मला गुरु भेटले. गुरु हे भगवान पाणिनी व भगवान आद्य शंकराचार्य आहेत. भगवान् श्रीमत् गुळवणी महाराज हे ' भगवान ' म्हणण्याइतके महान आहेत. त्यांना कसलीही अपेक्षा नाही. एवढेच नव्हे तर आपण दर्शनास गेलो असता दीक्षेबद्दल व आपण करीत असलेल्या साधनेबद्दल ते एका अक्षरानेही विचारत नाहीत. मी दीक्षा दिली हा ' मी ' चा भावच नाही. असो। सद्‌गुरु चरणी शतशः प्रणाम।



# श्रीमद्दासबोधातील पंथराज दर्शन

लेखक–वैद्य दत्तात्रेय वासुदेव पंडितराव, जामनगर.

**प्रस्तावन**–परमपूज्य श्री. गुरुमहाराजांची कृपा झाल्यानंतर जी सिद्ध-योगाच्या अभ्यासामध्ये वाटचाल सुरू झाली तिच्या प्रभावाने झालेल्या अंतर्बाह्य विस्मयकारक परिवर्तनांनी व अवीट आनंद लहरींच्या संवेदनांनी "सिद्धयोग आणि दासबोध" असा लेख श्रीगुरुकृपेनं लिहिला जाऊन तो श्रीदीपलक्ष्मीच्या जून १९७१ च्या श्रीगुरू–महाराजांच्या रौद्रीशांती विशेषांकात प्रसिद्ध झाला. त्याच वेळी श्रीगुरुमहाराजांच्या प्रेरणेने व आशीर्वादाने गुरुभक्त केशवराज जोशी यांच्या संपादकत्वाखाली "पंथराज" नावाचे त्रैमासिक सुरू झाले ही परमभाग्याची गोष्ट आहे. दैवयोगाने मला ही पंथराजाचें दर्शन श्रीदासबोधाचे आधारे शास्त्रीयविवेचन-द्वारा "पंथराज"च्या वाचकांसमोर यथामती मांडण्याविषयी इच्छा होऊन श्रीगुरु-महाराजांच्या कृपेने हा लेखप्रपंच केला जात आहे.

**पंथांचे विविधत्व**–'पंथराज शब्दामध्ये 'पंथ' व 'राज' असे दोन भाग आहेत पंथ म्हणजे मार्ग–रस्ता. पंथराज हे एक सामासिक पद आहे. हा समास सोडविण्याच्या भिन्न भिन्न पद्धतीनुसार अर्थ खालीलप्रमाणे आहे.

१ पथां राजा–मार्गांचा राजा–म्हणजेच सर्वमार्गांचा राजा–षष्ठीतत्पुरुष

२ पथिषु राजते–शोभते–इति । सर्व मार्गांमधे शोभून दिसतो, उठावदार दिसतो म्हणजेच श्रेष्ठपणाने शोभतो. सप्तमी तत्पुरुष.

३ पंथा च असौ राजा च–हा मार्ग आहे व हा राजा आहे म्हणजेच हा राजमार्ग आहे–कर्मधारय.

४ राज्ञां पथाः –राजपथः, पदपरिवर्तनात्पंथराजः । राजांचा मार्ग–म्हणजेच राजे ज्या मार्गाने जातात तो । षष्ठीतत्पुरुष.

याप्रमाणे सर्वमार्गामध्ये श्रेष्ठ असणारा हा कोणी एक मार्ग आहे इतके नक्की होते. यास अनुलक्षूनच इतर काही जिज्ञासा उत्पन्न होतात व त्यांचा अर्थ ही सहजच स्पष्ट होतो. जसे–

१. सर्व पंथामध्ये हा राजा आहे, असे सांगितल्याने इतर पंथ त्याचे प्रजाजन आहेत असे आपोआपच सिद्ध होते. तसेच 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने त्या इतर मार्गांचेही श्रेष्ठत्व आपोआपच सिद्ध होते. तथापि राजा प्रजापालन करतो व राजाच्या सत्तेनेच सर्व चालते. त्यामुळे इतरांचे श्रेष्ठत्व याच्या अस्तित्वाने सिद्ध होऊनही याचे त्या सर्वाहून श्रेष्ठत्व अभंगच राहाते. जसे "राजा राजपदी असता । उगीच चाले सर्व सत्ता '–श्रीदासबोध ७।७।६०.

२ इतर पंथांनी व त्यांनी सांगितलेले गंतव्य या सर्व पंथांचे ध्येय

अथवा गम्यस्थल एकच असले पाहिजे व त्या गम्यस्थलाकडे शीघ्र आणि अक्लेशाने घेऊन जाणे हे याच मार्गाचे श्रेष्ठत्व होय.

या विविध पंथांची सहेतुक मांडणी अथवा यथाभूतदर्शन दासबोधात जागोजाग आले आहे. जसे–

१) कर्ममार्ग उपासना मार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ॥ प्रवृत्तीमार्ग निवृत्तीमार्ग । सकळ जाणावे ॥ २।९।३२ (२) पावावया भगवंताते । नाना पंथ नाना मते ॥८।१।७

नाना पंथ, नाना मते अथवा नाना उपासना यांचे दर्शनार्थ स्वतंत्रचे स्वतंत्र समासही दासबोधात आहेत. दशक १६ चा नववा समास "नाना उपासना निरूपण" नावाचा आहे. त्या ठिकाणी, तसेच लोकमतनिरूपणाचे रूपाने अन्यत्र ही विविध उपासनांचा समावेश केला गेला आहे.

**विविध पंथाचे विविध अधिकारी**–हे नाना तऱ्हेचे पंथ वस्तुतः नाना तऱ्हेच्या जीवांच्या अधिकार भेदामुळे समाजात प्रसृत झालेले असतात व त्यांची स्थितीही त्या त्या पंथांच्या अनुयायांच्या मुळेच असते. जो ज्या पंथाचा अथवा मताचा अधिकारी असतो त्यास स्वभावतःच त्या मताचा अथवा पंथाचा अभिमान असतो. यामुळे साहजिकच त्यांना स्वपंथाचे श्रेष्ठत्व व इतर पंथांचे कनिष्ठत्व वाटत असते. जसे श्री रामदास सांगतात–

"जे जे निर्गुण म्हणती । उपासनेसी ॥ याचा कैसा आहे भाव । मज सांगे अभिप्राव ॥ अरे हा स्तुतीचा स्वभाव । ऐसा आहे" १६।९।२,३

अशा रीतीने स्वमताचे श्रेष्ठत्व प्रतिपादन यद्यपि योग्य व स्वाभाविक असले तरी सर्वांनीच त्याचा आश्रय केल्यामुळे त्या सर्वांच्या प्रतिपादनास कलहाचे स्वरूप आल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. या कलहास वादविवाद अथवा संभाषा असे कितीही सोज्वळ नाव दिले तरी त्या चर्चा ऐकून सामान्यजनच काय पण प्रत्यक्ष त्या त्या पंथांचे अनुयायी देखील साशंक होण्याचा संभव उद्भऊन मोठे वाद व बंडे उद्भवणे शक्य असते व मुळातच ज्यांची धर्माचरणाकडे प्रवृत्ती नाही असे पाखंडी लोक मात्र या बंडांचा फायदा उठवतात; व हे सर्व स्वमार्गाच्या अभिमानामुळे होते. जसे–

१) नाना मते निर्माण झाली । नाना पाषांडे वाढली ॥ नाना प्रकारची उठली नाना बंडे ॥ दा० ११।२।१६ (२) मतमतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला । जो जे मती सापडला । तयासि तेंचि थोर ॥ ११।२।२५

**भेदामधून समन्वय**–मार्गांचे भिन्नत्व वरीलप्रमाणे उत्पन्न झाले असले तरी "मार्गत्व" हा सामान्य धर्म सर्वात असल्याने त्या दृष्टीने त्या सर्वांचे एकत्व सिद्धच आहे. आणि शिवाय देवानेच हे सर्व भिन्नभिन्न मार्ग जीवांच्या अधिकार-भेदानुसार निर्माण केलेले असल्याने, त्यांच्यामध्ये एकत्व असणे शक्य आहे. स्वोचित मार्गाने जात असताना व स्वार्जित कर्मफळे उपभोगत असतानाच जसजशी जीवाची

प्रगती होत जाते तसतशी त्याला आवश्यक त्या पुढील पथांची माहिती परमेश्वर कृपेनेच मिळत असते. जसे–

**देवाकरितां कर्मे चालती । देवाकरितां उपासक होती ।। देवाकरितां ज्ञानी असती । कितीएक ।। नाना शास्त्रें नाना मते । देवचि बोलिला समस्ते । नेमकानेमक वेस्तावेस्ते कर्मानुसार । देवास अवघें लागें करावे । त्यांत घेऊं यें तितुके घ्यावे ।। अधिकारासारिखें चालावे। म्हणिजें बरें ।। १५।९।३० ते ३२**

तसेच–" **कर्ममार्ग उपासना मार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ।। प्रवृत्तिमार्ग निवृत्तीमार्ग । देवची चालवा ।। १४।४।५**

येथे 'देव' शब्दाने परमात्मा अथवा ईश्वर अभिप्रेत आहे. समष्टीपक्षी हा अर्थ अभिप्रेत असला तरी व्यष्टिपक्षी अंतरात्मा अथवा जीव अभिप्रेत आहे. " पंथराज " मध्ये सद्‌गुरुकृपेने जीवांची अभिन्नोपादान असणारी शक्ती जागृत होत असल्याने व ती जागृत शक्ती साधनकाळी त्या त्या जीवाच्या अधिकारभेदानुसार साधन सहजपणे करून घेत असल्याने " देव चि चालवी " हे वर्णन सार्थ आहे.

**प्रमुख मार्ग–" कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग ।। प्रवृत्तीमार्ग निवृत्तीमार्ग । सकळ जाणावे ।। २।९।३२**

या ओवीत श्रीरामदासांनी प्रमुख मार्गांचा समावेश केला आहे. पैकी " **कर्म उपासना आणि ज्ञान ।। त्रिकांड वेद हे प्रमाण** " १५।५।३२ या ओवी अर्धाने प्रथम तीन मार्गांचे महत्त्व व वेदानुयायित्व प्रतिपादिले. हे तीन मार्ग सर्वजनप्रसिद्ध आहेत व यांचे विशेष विवेचन येथे अभिप्रेत नसल्याने प्रमुखमार्गाविषयींचे हे सर्वच विवेचन दिग्दर्शनमात्र म्हणून येथे अभिप्रेत आहे.

" **सिद्धांतमार्ग** " या शब्दास सापेक्ष शब्द 'पूर्वपक्ष' आहे. 'पूर्वपक्षा'चे खंडण केले जाऊन सिद्धांत प्रतिपादला जातो, " **सिद्धांत साधाया कारणें । पूर्वपक्ष लागे उडवणे ।।** ( १०-९-२९ ) असे श्रीरामदासांनी सांगितले आहे. पूर्वपक्षाचे खंडण करून तो उडवावा असे जरी असले तरी सिद्धांतप्रतिपादनास अनुलक्षून त्याचे ही महत्त्व आहे व तोही समजला पाहिजे. जसे–

" **पूर्वपक्ष कोठून कोठवरी । वाच्यांशलक्ष्यांशाची परी ।। सूक्ष्म नाना विचार करी । धन्य तो साधु १७।४।९ ।।**

'सिद्धांत' प्रत्यक्ष ज्ञान असून पूर्वपक्ष 'अनुमान' होय व म्हणूनच 'अन्वय' आणि 'व्यतिरेक' या अनुमानभेदांचा समावेश पूर्वपक्षांत करीत असतानाच श्रीरामदासांनी सिद्धांताची सुंदर व्याख्या केली आहे. जसे–

" **अन्वये आणि वीतरेक । हा पूर्वपक्षाचा विवेक ।। सिद्धांत म्हणिजे शुद्ध येक । दुसरें नाही ।। २०।३।२१**

" **प्रवृत्ती व निवृत्ती** " हे दोन मार्ग दासबोधात इतरत्र ही उल्लिखित आहेत. यानाच क्वचित अध व ऊर्ध्व असा नामानेही संबोधिले गेले आहे. जसे–

"प्रवृत्ति चाले अधोमुखे। निवृत्ती धावे ऊर्ध्वमुखे। ऊर्ध्वमुखे नाना सुखें। विवेकी जाणती ॥ १२।८।१९ ॥

"कार्यात प्रवृत्त होऊन विस्तार वाढविणे हा प्रवृत्ती शब्दाचा अर्थ होय. या उलट "विषयातून चित्त काढून परब्रह्माकडे लावणे" निवृत्ती होय. तथापि प्रवृत्ती म्हणजे रुढी किंवा परिपाठ असा ही अर्थ असून त्या अर्थानि ही या शब्दाचा उपयोग दासबोधात आहे. जसे–" तरी हें प्रवृत्तीचें बोलणे। प्रत्ययास आणि उणे ॥ ९।७।११ रूढीच्या विरुद्ध 'प्रत्यय' मार्ग होय हे ही या ओवीवरून स्पष्ट होत आहे. वरील ओवीशिवाय (२।९।३२) "नरदेहस्तवन" नामक प्रथम दशकाच्या दहाव्या समासात ओळी २ ते १६ पर्यंत अनेक मार्गांचा उल्लेख आहे त्या सर्वांची सविस्तर चर्चा येथे आवश्यक नाही.

गुप्तपंथ (१-९-५ व १-१०-१३); गुरुगम्य मार्ग (४-४-१३), सद्गुरु वचनपंथ (५-३-३१); साधनपंथ (५-९-५५); मीपणाचा पंथ (७-७-४३); परमार्थ पंथ (७-९-६); पुण्यमार्ग (१०-७-११); अन्यायमार्ग (१०-७-१२); भक्तिमार्ग (१४-३-४९); राजपंथ (१५-१-१२); चोरपंथ (१५-१-१२); वगैरे आणखी ही नावे दासबोधात आली आहेत. या पंथांचा विचार विस्तारभयास्तव येथे न करता प्रत्यक्ष 'पंथराज' वर्णनाचे वेळी यथावश्यक केला जाईल.

## पंथराज वैशिष्टचे

**१ गूढत्व अथवा गुप्तत्त्वः–** 'पंथराज' अत्यंत गूढ व गुप्त आहे. याला जाणणारे लोकांमध्ये सामान्यजनाप्रमाणे वावरत असून गुप्त असतात पण योग्य शिष्य पाहून ते त्यालाही पंथराजाच्या प्रवासात प्रविष्ट करून देतात. समर्थ योगीच यास जाणतात. इतरांना हा मार्ग ज्ञात होत नाही. जसे–" आकाशमार्गी गुप्त पंथ। जाणती योगिये समर्थ। इतरास हा गुह्यार्थ। सहसा न कळे ॥" –१।९।५ गुप्त अथवा गूढ अशा परब्रह्माचा साक्षात्कार करविणारा हा मार्ग असल्याने याला गुप्तपंथ म्हणतात. जसे "येक योगी गुप्तपंथे। ब्रह्मभुवना पावले ॥–१०।१०।१३

**२ योगाभ्यासप्रवर्तकत्त्व :–** हा मार्ग योग्यावाचून इतराना ज्ञात नसल्याने हा योगमार्ग आहे हे स्पष्टच होय व याला जाणणारे समर्थ योगी असल्याने ते आपल्या विशेष सामर्थ्याने ज्यांना या मार्गाने प्रवृत्त करतात त्यालाही योगाभ्यास घडतो. म्हणून या मार्गाच्या प्रवाशास देखील गौरवाने 'योगी' असे संबोधले जाते.

योग्यांना ब्रह्मभुवनाकडे घेऊन जाणारा हा पंथ 'गुप्त' आहे असे म्हटले तसेच 'गुप्तवल्ली पाल्हाळली' (१०।१०।२९) व 'चंचळ नदी गुप्त गंगा' (११।७।१) असे ही आणखी दोन उल्लेख आढळतात. यावरून योग्यांना ब्रह्मसुख मिळवून देणारा हा गुप्तमार्ग म्हणजेच सुषुम्णापथ होय हे लक्षात येईल. 'गुप्तवल्ली' कुंडलिनीशक्तीचे नाव असून ती स्वभावतःच प्राणिमात्रामध्ये गुप्तरूपाने असून तिचा आश्रय करणाऱ्यांना गंगेप्रमाणे ती पावन करणारी असल्याने तिलाच

' गुप्तगंगा ' म्हटले आहे. श्रीगुरुमहाराजांच्या कृपेने सिद्धयोगाची दीक्षा होताच ही गुप्त ( सुप्त ) वल्ली प्रकट म्हणजेच जागृत होऊन ऊर्ध्वपथामध्ये प्रविष्ट होऊ लागते व साधकांच्या अधिकारभेदानुसार प्रगतीसाठी आवश्यक अशा सर्व गोष्टी सहज म्हणजे विनासायास घडवीत असते. या प्रमाणे योगाभ्यासप्रवर्तकत्त्व व तदर्थ आवश्यक सर्वकार्यकर्तृत्व या मार्गाच्या सामर्थ्याने समाविष्ट असल्याने हा श्रेष्ठ होय.

३ राजमार्गत्व–' पंथराज ' या शब्दाने या मार्गाचा उल्लेख श्रीज्ञानेश्वरीमध्ये आहे. पदपरिवर्तनाने " राजपंथ " असा शब्द बनतो व राजे ज्या मार्गाने जातात तो ' राजपंथ ' असा त्याचा अर्थ होतो. या अर्थाने या मार्गाचा उल्लेख दासबोधामध्ये पुढीलप्रमाणे आहे.––

राजे जाती राजपंथे । चोर जाती चोरपंथे ॥ वेडे ठके अल्पस्वार्थे । मूर्खपणें ॥ –१५।१।१२

आत्मदशकाच्या चातुर्यविवरण नामक समासातील ही ओवी होय. पूर्वापार संबंध पाहता हा सर्वच समास गूढार्थ बोधक आहे. संपूर्ण समासामध्ये या मार्गाचे महत्त्व प्रतिपादिले आहे. थोडक्यात यथामती विवरण पुढील प्रमाणे :–

ओवी १– जीवेश्वराची वस्ती हाडामांसाच्या शरीरात असते व जीव माया-विशिष्ट असल्याने नाना तऱ्हेच्या विकारांनी युक्त असतो.

ओवी २– सारासाराची परीक्षा अथवा इच्छाद्वेष या भावांची व्यक्ती बुध्यादिद्वारा जीवच करीत असतो.

ओवी ३– लोभाने व योगाने विविध वस्तूंचा संग्रह करणे हा प्रवृत्तिमार्ग ( येकी मागमागो घेणे ) व सर्व भार ईश्वरावर टाकून कशाची ही इच्छा न करणारांना मात्र आपोआप सर्व वस्तूची प्राप्ती होणे ( येका न मागताच देणे ) अशा तऱ्हेच्या अनुभवगम्य लक्षणारून जीवांची परीक्षा होते.

ओवी ४ ते ७– जीव हा शिवाचाच अंश असल्याने जीवाने विचारपूर्वक ( सदरूंच्या कृपेने ) स्वतःचे शिवत्त्व जाणले तर अन्य जीवही त्याच शिवाचे अंश असल्याने सर्व जीवांचे यथाभूतदर्शन घडून प्रत्यक्षज्ञानाचे समाधान लाभेल. अन्यथा अनुमान वाढून कार्यभाग नष्ट होतो.

ओवी ८ ते १०– वरीलप्रमाणे विचार न करता लोक अन्यमार्गाने जाऊ पाहतात व त्यामुळे अयशभागी होतात. कारण अपूर्ण जीव पूर्ण शिवास योग्य मार्गाशिवाय जाणू शकत नाही.

ओवी ११– श्रीरामदास म्हणतात की योग्य मार्गाने–प्रशस्त मार्गाने जाणे हे श्रेष्ठ ( उत्तमाधिकारयुक्त ) जीवच करू जाणतात व कनिष्ठ, कृत्रिम म्हणजे काही तात्कालिक अपूर्ण उपायांनी पूर्ण वस्तूची प्राप्ती–कार्ये करतात व प्राण्यांमध्ये अशा तऱ्हेचा भेद कर्मानुसार घडतो.

ओवी १२– राजे म्हणजे श्रेष्ठ जीवच राजपथानें जातात व कनिष्ठ जीव म्हणजे चोर होत व ते चोरपथानें जातात. परमार्थाकडे प्रवृत्त करणारे सिद्धयोग-मार्गाशिवायचे ( पंथराजाशिवायचे ) मार्ग येथे चोरपंथ या शब्दाने अभिप्रेत आहेत व चोरपंथाने जाणारे लोक काही अल्पस्वल्प स्वार्थाच्या योगाने त्या मार्गाने जाण्यास प्रवृत्त झाले असल्याने ते मूर्ख होत व त्यांना खऱ्या वस्तूची प्राप्ती न झाल्याने ते फसतात.

११ ते १३– चोरपंथाने जाणाऱ्यांनाही असे वाटते की आपलाच मार्ग श्रेष्ठ असून आपण शाहाणेच आहोत पण राजपंथाच्या मानाने ते मूर्खच असून दीनवाणे असतात. त्यांना समाधान मिळत नाही. राजपंथाने जाणाऱ्यांना समाधानाचा अनुभव येण्याने ' समाधान ' म्हणजे काय ते त्यांना ठाऊक असते.

ओवी १४–कारण राजपथाने जाणारे जीवशिवात अभेद पाहून अभ्यास योगाने स्वतःच्या जगदांतररूप शिवस्वरूपासही जाणतात व मग त्यांना इहपरलोकी सर्व समाधान मिळते. त्यांना काय कमी आहे ?

१५ ते १८– तथापि अशा रीतीने राजपथाने वा चोरपथाने जाण्याची जीवांची बुद्धी कर्मपराधीन असल्याने परमेश्वराधीनच मानली जाते. कर्मपराधीन असल्याने जीव स्वस्वकर्मानुसार मार्गात प्रथम प्रवृत्त होतात आणि अभिमानाने प्रेरित होऊन चालत असतात. त्या प्रत्येकास " आपणच थोर, आपणच सुंदर, आपणच चतुर " असे वाटत असते. पण राजपथाने जाणारे जे जाणते असतात त्यांना हे सर्व माहीत असते.

ओवी १९, २०–चोर पथाने जाणारे हे सर्व लोक आपापल्या पथाच्या अभिमानाने यद्यपि त्याला श्रेष्ठ मानत असले तरी श्रेष्ठता विचारपूर्वक परीक्षीली पाहिजे. तथापि एवढा समंजसपणा व खऱ्याखोटया कसोटया लावणे हे त्यांना नकोच असते. तोच मूर्खपणा होय.

ओवी २१, २२–येथे कदाचित कोणास अशी शंका येईल की, पंथराजाशिवाय सर्वांचा चोरपंथांत समावेश करून त्यांचे गौणत्व व पंथराजाचे श्रेष्ठत्व प्रतिपादन करणे हाही पंथराजाचा अभिमानच नव्हे कां ? इतरांचा त्या त्या पंथांचा अभिमान तेवढा अयोग्य आपलाच तेवढा योग्य हे कसे ? यावर श्रीरामदास म्हणतात की, " सत्याचा जो साभिमान " (पंथराज सत्य असून त्याने सत्य वस्तू प्राप्त होते ) " तो जाणावा निराभिमान. " कारण योग्य व अयोग्य यांची समानता कधीच मानता येत नाही. पंथराजाने जाणारांना न्याय मिळतो, शाश्वतसुख मिळते व इतरांना अन्याय–अशाश्वत सुख मिळते म्हणून यांची बरोबरी होऊ शकत नाही.

ओवी २३ –याहून स्पष्ट सांगावयचे तर पंथराजाने जाणाऱ्यांना उघड भाग्य मिळत असते. म्हणजे या मार्गात जीवाचा प्रवेश श्रीसद्‌गुरुकृपेने होताच त्याला तत्काळ परमार्थमार्गातील चांगले अनुभव येऊन समाधान मिळते व या मार्गात

त्याला गोडी वाटते. मात्र इतर मार्गांनी जाणाऱ्यांना सर्व यथोक्त करूनही त्यांना लौकर अनुभव येत नसल्याने चोराप्रमाणे मधूनच ते पळून जातात म्हणजे त्यांच्या उपासनेत खंड पडतो. त्यांना तेवढी आवड वाटत नाही. त्यामुळे पंथराजाने जाणारांचा मोठेपणा प्रगट असतो. म्हणजे ते स्वतःही समाधानी असतात व इतरांनाही "हा समाधानी आहे" असे वाटत असते. अन्य मार्गाने जाणारांचे समाधान असे पक्के नसल्याने त्यांना समाधानाचा आव आणावा लागतो व तो फार काळ टिकत नाही. ओवी २३ ते २४–या बारा ओव्यात राजपथाने जाणाऱ्यांसाठीही काही मार्गदर्शन श्रीरामदासांनी केले आहे.

**४ अन्तरिक्षमार्ग** :–हा मार्ग ' अन्तरिक्ष ' असल्याचा उल्लेख श्रीदासबोधात पुढीलप्रमाणे आहे–

मार्ग होय परि अंतरिक्ष । जेथे सर्वहि पूर्वपक्ष ॥
पाहो जाता अलक्ष । लक्षवेना ॥ "–४–४–१३

"आकाशमार्गी गुप्त पंथ" (१।९।५) असाही उल्लेख आलाच आहे. ' अंतः ' म्हणजे ' आत ' म्हणजे पाहाणे–म्हणजे अंतरिक्ष असा याचा अर्थ आहे. यासंबंधीचे "दासविश्रामधामातील" विशेष वर्णन दासबोधाच्या तळटीपेत दिले आहे ते येथे लक्षणीय आहे. जसे–

"अंतरिक्ष ऐसे आकाशाचे नाव । शुद्ध ते जाणीव अंतरात्मा ॥ १ ॥ काढिता तेथील शुद्धत्वाचा डाग । गुरुगम्य मार्ग उफराटा ॥ २ ॥ चहूं भूतातीत शुद्ध जे आकाश । तेंचि चिदाआकाश ज्ञानघन ॥ ३ ॥ ईक्ष् तें पाहणें अंतः ते अतौत । अंतरिक्ष पंथ याचें नाव ॥ ४ ॥ स्थूळांतरी सूक्ष्म सूक्ष्मीकारण । त्यापरते ज्ञान ज्ञानी दृष्टा ॥ ५ ॥ दृष्टत्वी चालता होय निराधार । मग परात्पर स्वयें वस्तु ॥६॥ येणें पंथे जातां अंतरींचा ईश । व्यापे सावकाश भेदातीत ॥ ७ ॥ जेथे पूर्वपक्ष होय सर्वस्वासी । ते देव अनायासी आत्माराम ॥ ८ ॥

**५ गुरुगम्यत्व**–हा मार्ग गुरुगम्य असून गुप्त वस्तूस प्रगटविणारा असला तरी स्वतः अलक्ष आहे. म्हणूनच याचे बाबतीत सर्व पूर्वपक्षच होत. याच्या वर्णनासाठी जे प्रयत्न करावेत ते सर्व पूर्वपक्षात अंतर्भूत होतात व हा सिद्धांतरूपाने सर्वोपरी राहातो. या गुरुगम्य मार्गात ज्यांचा प्रवेश झाला आहे त्यांना गुरुकृपेने जे अनुभव येतात त्यांचे यथानुभूत वर्णनही शक्य नसते. मग कार्यकारणभावादिद्वारा विवेचन कसे शक्य आहे? तथापि साधकाना येणारे अनुभव त्यांना प्रत्यक्ष असल्याने ते त्यास मिथ्या अथवा अप्रगट ही म्हणू शकत नाहीत. म्हणूनच रामदास सांगतात– "अनुर्वाच्य समाधान जाले । तें पाहिजे बोलिले ॥ बोलिल्यासाठी समाधान गेले । हे तो घडेना ॥ २०।७।१

या प्रमाणे प्रगट व अप्रगट या उभयरूपाने याचे वर्णन असून हा केवळ गुरुकृपेनेच गम्य म्हणजे समजण्यास अथवा अनुभवण्यास योग्य होतो. असे

" प्रगट वसोनी नसे । गोप्य असोनि भासे । भासा अभासाहूनि अनारिसे । गुरुगम्य मार्ग ॥ ४।४।१२—तसेच—" नातरी पहाता दिसेना । गुरूअंजनेविण ॥ १,९.१०

सद्‌गुरुकृपेशिवाय प्राप्त होणारे इतर मार्ग अंधानुकरणरूप आहेत. असे वर्णन आहे. जसे—

" सद्‌गुरुकृपा न जोडे । आणि भलतीचकडे वावडे ॥ जैसे आंधळे चाचरोन पडे । गारी आणि गडधरा ॥ ५।१।३७

६. ऊर्ध्वमुखत्व :— प्रवृत्तीमार्ग व निवृत्तीमार्ग यानाच अध व ऊर्ध्व अशी नावे आहेत. श्रेय व प्रेय असे दोन मार्ग उपनिषदातही वर्णिलेले आहेत. प्रेयाने अधोगती व श्रेयाने ऊर्ध्वगती प्राप्त होते. पदार्थज्ञान प्रेयामध्ये येते व श्रेयामधे केवळ वस्तुज्ञान अंतर्भूत होते. श्रेयोरूप ऊर्ध्वमार्गात प्रवृत्ती श्रीगुरुकृपेने होते व " विचार " प्रवणता येते. जसे—

विचारे ऊर्ध्वं चढती । तयासी च ऊर्ध्वगती ॥ येरा सकळा अधोगती । पदार्थज्ञाने॥ पदार्थ चांगले दिसती । परी ते सर्वे चि नासती ॥ अतो भ्रष्ट ततो भ्रष्ट होती । लोक तेणे॥ या कारणे पदार्थ ज्ञान । नाना जिनसीचा अनुमान । सर्व सांडून निरंजन धुंडीतजावें ॥ १७—३—२१ तें २३ " ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था । मध्ये तिष्ठंति राजसाः ॥ या श्रीगीतावाक्याचाही हाच आशय होय.

मायेची प्रवृत्ती अधोमुख असून ब्रह्माची ऊर्ध्वमुख असते. ऊर्ध्वमुख झाल्या-शिवाय ब्रह्मानुभव नाही. ऊर्ध्वमुख होण्याने भेद नाहीसे होऊन एकत्वानुभव म्हणजेच ब्रह्मानुभव साधकास श्रीगुरुकृपेने येतो. जसे

" अधोमुखे भेद वाढतो । ऊर्ध्वमुखे भेद तुटतो ॥ निःसंगपणे निर्गुणी तो । महायोगी ॥ २०—३—२२

७. सर्व श्रेष्ठत्व :— " कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड वेद हे प्रमाण " १५।५।३२ तसेच कर्म उपासना आणि ज्ञान । येणे राहे समाधान " ११—३—३०

याप्रमाणे कर्म उपासना व ज्ञान यांचें श्रेष्ठत्व श्रीदासबोधात वर्णिले असताना " पंथराज " यामध्ये कोठे येतो अथवा " पंथराज " याहूनही भिन्न आहे की काय असे वाटणे साहजिक आहे. म्हणून पंथराजाचे सर्वोपरित्व प्रतिपादनासाठी थोडा प्रपंच येथे केला जात वाहे.

कर्म, उपासना व ज्ञान या जीवाच्या उन्नत्तीच्या क्रमशः प्राप्त होणाऱ्या स्थिती प्रारंभिक स्थिती असून कर्ममार्ग होय. वेदोक्त कर्मांचे यथाविधी आचरण करणे तसेच स्वस्ववर्णाश्रमधर्मानुरूप नित्य नैमित्तिक कर्मांचे यथाविधी आचरण करणे म्हणजे कर्ममार्ग होय. " मिमांसा " शास्त्रामधे कर्ममार्गाचा प्रामुख्याने विचार आहे. सकाम व निष्काम असे याचे दोन भाग आहेत. कर्ममार्गाचे आचरण करणारांना कर्मांचे विधिवत ज्ञान योग्य आचार्यांकडून संपादन करावे लागते व यथाविधी आचरणाने त्यांना त्या त्या कर्मानुसार लाभ होत असतात. धर्मानुसाराने ठिकाणी क्रमशः अधिक

रूची पैदा होऊ लागताच धर्माने कर्मापाठोपाठ उपासना नेमून दिली आहे. उपासना म्हणजे ज्या देवतेसाठी कर्म चालू असेल (पूजा अथवा यज्ञ इत्यादी) तिच्यासमीप वसणे. थोडा वेळ स्वस्थ वसणे. अशा वसण्याने कर्माचरणाने शुद्ध झालेल्या शरीरास व मनास स्वस्थता लाभते. आणि त्याच्या ठिकाणी त्या देवतेच्या कृपाप्रसादाने स्वाभाविकच ज्ञानोदय होऊ लागतो. हीच ज्ञानरूप तिसरी स्थिती होय. उपासना चालू असतानाच इष्ट देवतेचा जप अथवा ध्यान इत्यादिद्वारा ज्ञानाचे स्थिरीकरण करण्यास सांगितलेले असते. याप्रमाणे कर्म, उपासना व ज्ञान या वेदोक्त त्रिविध प्रकारांनी ज्ञानबोध होत असतो.

'पंथराजा' मध्ये या तीहींचाही समावेश असल्याने हा सर्वश्रेष्ठ होय. 'जीव' भिन्नभिन्नाधिकारयुक्त असल्याने स्वाधिकारानुरूप कर्माचरण करण्यानेच लाभ होतो. तथापि कोणत्या जीवास कोणते कर्म योग्य आहे याविषयी निर्णायक निवाडा कोण देणार ? शिवाय विधिविरहित अथवा चुकीच्या विधीने कर्म केले तरी फळ मिळत नाही. जसे–

"यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः। न स सिद्धिमवाप्नोती न सुखं न परां गतिः ॥या व अशाच तऱ्हेच्या अन्य कारणांनी कर्माचरण कठीण होऊन बसते. तसेच " तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ । ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसी ॥ या गीतेतील उपदेशानुसार शास्त्राध्ययन करून कर्म करावे तर तेही सोपे नाही व शास्त्रेही भिन्नभिन्न उपदेश करतात म्हणून अंती निवाडा होत नाही. जसे – " वेद शास्त्र श्रुति स्मृती। तेथे वाक्य भेद पडती ॥ " ६–६–२६

यामुळे कर्ममार्गाचा आश्रय करणे खरोखरच कठीण होय. त्यातूनही करून लाभ न झाल्यास तद्विषयींच्या श्रद्धेस धक्का बसून मनात संशय येतो व ते बंद पडते. जसे श्री रामदास सांगतात.

"कर्ममार्ग संशयें भरला। साधनी संशये कालवला ॥ सर्वांमध्ये संशये भरला। साधू तो निःसंदेह ॥ ५–१०–१४"

त्याचप्रमाणे कर्ममार्गादींचा आश्रय निर्विकार देवाच्या ज्ञानासाठी यद्यपि उपयोगी असला तरी तो सर्व चंचलाच्या म्हणजे मायेच्या आश्रयाने असतो. विशेषतः कर्मभाग हा मायोपाधिकच आहे. चंचल म्हणजे माया व निश्चल म्हणजे परब्रह्म यांच्यामधे सीमा कल्पिल्यास त्या सीमेपर्यंतचे जे विधी ते सर्व कर्ममार्गात येतात. उपासना आणि ज्ञान हे संधीमार्गावरील विधी होत. या संधिमार्गातून पुढे जात असता साधकाची बुद्धी भांबाऊन जाते. जसे

"चंचळ निश्चयाची संधी। तेथे भांबावते बुद्धी ॥ कर्ममार्गाचे जे विधी। ते मग ऐलिकडे ॥ " ११–४–७



पंथराजाने प्रवास करणारा साधक मात्र गुरुकृपेने युक्त असल्याने चंचल-

निश्चयाच्या सीमेवर आला तरी भांबाऊन जात नाही व अलीकडील विधीचे आचरण करणारादेखील स्वाधिकारानुसार त्याचे आचरण करून योग्य वेळी तो पलीकडील प्रांतात प्रविष्ट होऊन सुखेनैव पुढील मार्गक्रमण करीत असतो. याचे प्रमुख कारण म्हणजे साधकाची सद्‌गुरूवरील दृढ निष्ठा हेच होय. अशा दृढ-निष्ठेच्या बळाने हा मार्ग साधकांना तारून नेतो. वाटेल ती संकटे आली तरी तो भिऊन जात नाही. अथवा कितीही प्रलोभने आली तरी तो भुलून जात नाही तर आपल्या गुरूपदिष्ट मार्गाने धीराने जात असतो व त्यामुळे त्यास त्याच्या मार्गा-पासून–ध्येयापासून कोणीही विचलीत करू शकत नाही. जसे श्रीरामदास सांगतात

"लागता सद्‌गुरूवचनपंथे । जाहले ब्रह्मांड पालथे ।। तरी जयाच्या शुद्ध भावार्थे । पालट न धरिजे ।।" ५–३–५१ या अनन्यसाधारण महत्त्वामुळेच 'पंथराज' सर्व श्रेष्ठ आहे.

"पंथराजा" चे सर्वश्रेष्ठत्व सांगत असताना 'ज्ञानमार्गाविषयी' ही थोडे लिहिणे उचित आहे. वस्तुतः "अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया । चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरुवेनमः" या उक्तीत सांगितल्याप्रमाणे ज्ञान हे केवळ श्रीसद्‌गुरूंच्या कृपेनेंच मिळत असते. सद्‌गुरुंच्या कृपेने मिळणारे हे ज्ञानच आत्मज्ञान होय. व 'पंथराजा' मध्ये साधकांना ज्या वेळी दीक्षा होते त्या वेळी त्यांच्यातील ज्ञानशक्तीच जागृत होत असते त्यामुळे 'पंथराज' हा ज्ञानमार्गच होय. तथापी 'पंथराज' हा केवळ ज्ञानमार्ग नसून ते ज्ञान साधकांच्या गळी त्यांच्या अधिकारानुरूप उतरविणारा असा आहे व या त्याच्या विशेष गुणामुळेच तो 'रूढ' ज्ञानमार्गाहून श्रेष्ठ आहे. येथे कदाचित् अशी शंका येईल की 'पंथराज' ज्ञानमार्गच होय असे म्हणणे व तो रूढ 'ज्ञानमार्गाहून' मार्ग श्रेष्ठ आहे. असे म्हणणे विरोधाभास नाही काय ? पण तसे नाही. 'ज्ञानमार्ग' हा शब्द व्यवहारात वेगळ्या अर्थाने रूढ आहे. तो कसा ते सांगतो.

'शुद्ध ज्ञान' असा एक शब्द दासबोधात येतो. जसे–ऐसें शुद्ध ज्ञान पुसिले । ते पुढीले समासी निरोपिले ।।" ५–५–३९ असा बहुधा ज्ञाननिरूपण या समासाचा उपसंहार केला. या बहुधा ज्ञाननिरूपणात जे विवेचन आहे, अथवा ज्ञान म्हणून ज्यांचा ज्यांचा निर्देश आहे त्याला व्यवहारात ज्ञान मानले जाते. पण हे खरे ज्ञान नव्हे असे श्रीरामदास सांगतात. जसे–

"असो सकळ कळाप्रवीण । विद्यामात्र परिपूर्ण ।। तरी ते कौशल्यता परी ज्ञान । म्हणोचि नये ।।" ५–५–३२ बहुत प्रकारींची ज्ञाने । सांगो जाता असाधारणे । सायोज्यप्राप्ती होय जेंणे । तें ज्ञान वेगळे ।।" ५–५–३७

या प्रमाणे शुद्धज्ञान हेच समाधान करणारे होय व ते सायोज्यता मिळवून देते. तें इतर म्हणजे शबलज्ञानाहूंन भिन्न आहे इतकेच निश्चित झाले. या शुद्ध-ज्ञानाचा उदय सद्‌गुरुकृपेनेंच होतो अन्यथा त्याचा संभव नाही असे श्रीरामदासांनी स्पष्ट सांगितले आहे. वरील सामान्य ज्ञान तुरीयावस्थेपर्यंतच होय व जोपर्यंत

ज्ञानाची जाणीव आहे तोपर्यंत ते द्वैतभाव उत्पन्न करणारे असल्याने श्रेष्ठ नव्हे. ब्रह्मज्ञान म्हणजेच स्वरुपज्ञान हेच शुद्धज्ञान होय. इतर सर्व ज्ञाने सबळ (शवळ) होत. जसे–

"ज्ञान म्हणिजे अद्वैत। तुर्या प्रत्यक्ष द्वैत ॥ म्हणौनि शुद्ध ज्ञान ते सतत। ते वेगळे चि असे ॥ ऐक शुद्ध ज्ञानाचे लक्षण। शुद्ध स्वरूपचि आपण ॥ या नाव शुद्धस्वरूपज्ञान। जाणीजे श्रोती ॥ ५।६।९।१०

अशा शुद्धज्ञानाचा उदय पंथराज दीक्षेने होतो म्हणून ती सर्वश्रेष्ठ होय. या ज्ञानांकुराची वाढ होऊन ज्ञानबोध स्थिर होण्यास साधनाची आवश्यकता व ते साधन हाच 'पंथराजप्रवास' होय. मात्र हा 'पंथराज' असल्याने यात सुखाने प्रवास अभिप्रेत असतो व श्रीगुरूंची कृपा साधकाचे सर्वदा रक्षण करून त्यांचा प्रवास सुखाने घडत असतो.

श्रीगुरुकृपेने होणाऱ्या या ज्ञानोदयाने उपासनेमध्ये–साधनेमध्ये–रुची वाढते व शास्त्रांचे ठिकाणी रुची आणि तदनुसार आचारणाकडे प्रवृत्तीही होऊ लागते. इतर कोणत्याही उपायांनी अशी रुची उत्पन्नही होत नाही व वाढतही नाही. ज्यांना स्वभावतःच अथवा सद्गुरुप्राप्तीशिवाय ईशभजनाची आवडी असते, त्यांना ती त्यांच्या पूर्व- कर्मांच्या फलस्वरूपाने मिळालेली असते त्या व भजनाच्या जोरावर योग्य वेळी भगवत्कृपेने त्यांना सद्गुरुपदेश होऊन त्यांच्यामध्ये शुद्ध ज्ञानाचा उदय होतो. म्हणूनच दासबोधामध्ये व इतरत्रही 'गुरु' आणि 'सद्गुरु' अशी स्वतंत्र संबोधने व उभयतांची स्वतंत्र वर्णने आहेत. "येक गुरु येक मंत्रगुरु" इत्यादीपासून पुढील तीन ओव्यांत ( १।२।६६, ६७, ६८ ) सतरा ( १७ ) गुरु वर्णिले व आणखी गुरु आहेत असे "ऐसे हे सत्रा गुरु। याहि वेगळे आणिक गुरु" (५।२।६९) या ओवीने सांगून शेवटी म्हणतात, "असो ऐसे उदंड गुरु। नाना मतांचा विचारु। परि जो मोक्षदाता सद्गुरु। तो वेगळाची ॥" (५, २, ७२).

पंथराजाच्या प्रवासाने उपासनेविषयी–साधनाविषयी–इतकी आवड उत्पन्न होते की, तो ( साधक ) उपासनेहून श्रेष्ठ दुसरे काहीच मानीत नाही. उपासनेनेच त्याचा ज्ञानबोध स्थिर होऊन त्यास अनुभव येऊ लागल्याने उपासना व ज्ञान यातील भेदच नाहीसा होतो. श्रीरामदासांनी स्पष्ट म्हटले आहे की,–

१) "ज्ञान आणि उपासना। दोनी येक चि पाहावा ॥ उपासनेकरिता जना। जगोद्धार ॥– १३।२।८ (२) "उपासना ज्ञानरूप"–२०।४।२०। (३) "उपासना म्हणजे ज्ञान" २०।४।२२

यात्रमाणे पंथराजाने प्रवास करताना आपोआपच ईश्वरी सत्तेची अगाधता प्रत्यास येऊ लागून सर्व तऱ्हेने ( काया-वाचा-मनाने ) ईश्वरास शरण जाण्याची जीवाची तयारी असते. अशी तयारी होणे याचाच अर्थ अहंकाराचा नाश होऊ

लागणे होय. श्रीगुरुमहाराजांच्या दीक्षेच्या वेळी जे स्वस्थ बसण्यास सांगितले जाते

तो अहंकारनाशाचाच प्रकार होय. याप्रमाणे गुर्वाज्ञेवरून अहंकार सोडून ज्या क्षणाला आत्मनिवेदन घडते त्याचक्षणी श्रीगुरूची अमोघ शक्ती त्या अहंकार-विरहित अतएव ज्ञानाधिकारी क्षेत्रात प्रविष्ट होऊन शरणागताच्या ज्ञानशक्तीस जागृत करते. क्षणकाल घडणारे हे आत्मनिवेदन जीवाला ब्रह्मप्राप्तीचे अधिकारी बनविते. हा शक्तिपातदीक्षेतील–पंथराजप्रवेशातील–सर्वात श्रेष्ठ भाग होय. अतएव पंथराजाची सर्वश्रेष्ठता अनिर्वचनीय होय.

क्षणकाल स्वस्थ बसताना घडणाऱ्या आत्मनिवेदनाने एवढ्या मोठ्या–ब्रह्मप्राप्तीच्या अधिकाराची प्राप्ती कोणास संभवनीय वाटणार नाही पण अशी शंका येण्याचे मुळीच कारण नाही.

श्रीभगवंतानी अर्जुनास योगाभ्यास उपदेशिल्यावर स्वतःच्या योग्यतेविषयी अर्जुनाने शंका उपस्थित केल्याचे वर्णन श्रीज्ञानराजांनी केले आहे. त्याचे उत्तर-रूपाने भगवान सांगतात –

"नाव एक विरक्तु। जाला देहधर्मि जरी नियतु॥ तरी तोचि नव्हे व्यवस्थितु। अधिकारिया॥ एतुलालिये आणि माझिवडे। योग्यपण तूंतेही जोडे॥ ऐसे प्रसंगें सांकडे। फेडिलें तयाचें॥ –ज्ञानेश्वरी ६।३४२–४३

अहंकारास 'मीपणा' हा शब्द वापरला जातो. अहंकाराचा म्हणजेच मीपणाचा पंथ परमार्थमार्गातील मोठा अडसर आहे व या मीपणाच्या पंथाने जोपर्यंत जीव जात असतात तोपर्यंत त्यांचा संशय जात नाही व त्यांना प्रत्यही येत नाही. यासाठी परमार्थात प्रवेश करावयाचा असेल तर मीपणाचा पंथ सोडला पाहिजे. जसे–

"तरी तो पथचि सोडावा। मग परमार्थ जोडावा॥" ७।७।४४

श्रीदासबोधातील हे वर्णन व श्रीज्ञानेश्वरीतील वरील वर्णन यातील साम्य किती तंतोतंत आहे हे सहज स्पष्ट व्हावे व परस्पर वचनांच्या साधर्म्याने शक्तिपातदीक्षेविषयीचे महत्त्व स्पष्टपणे कळावे म्हणून विस्तार पत्करूनही दोन्ही संदर्भ दिले. जीवाचे जीवपण व मनाचे मीपण नाहीसे करण्याचे सामर्थ्य 'पंथराजा'चे असल्याने तो सर्वश्रेष्ठ आहे. उपासनेंच्या साहाय्याने उत्तरोत्तर प्रगती होते. श्रीरामदास सांगतात–"उपासना शोधून पाहिली। तो ते विश्वपाळिती जाली॥ न कळे लीला परिक्षीली। न वचे कोणा॥" १५।९।२६ "विचार नेहटूनचा पाहे। तरी उपासना आपणचि आहे॥ येक जाये एक राहे। देह धरूनी॥" –२०।४।२३

याप्रमाणे "विश्वपालन" करणारी "पंथराज" उपासना आहे. तिच्या सामर्थ्याचे परीक्षण शक्य नाही. त्याचे वर्णनही करता येणार नाही. उपासकच उपास्य होऊन जातो असा याचा अगाध महिमा आहे. श्रीगुरुकृपेने याचा अनुभव घ्यावा आणि समाधान पावावे. श्रीगुरूंचे कृपेनेच लेखनाची इच्छा होऊन 'पंथराज' दर्शनाची इच्छा होऊन श्रीदासबोधाच्या आधारे त्याचे गुणगान करता आले व लेख पुरा झाला. हे सर्व श्रीगुरुकृपेचेच फळ होय. त्यांचेच चरणी सादर समर्पण करून लेख संपवितो.

श्रीगणेशः सद्गुरुभ्योनमः

## श्रीगुरुभक्तांना निवेदन

परमपूज्य प्रातःस्मरणीय श्रीगुळवणी महाराज यांचे हस्ते मागील ज्येष्ठात रौद्रीशांति कर्म पार पडलेले सर्वांना विदितच आहे. त्याचा अहवाल पंथराजाच्या मागील अंकात दिलेला आहे.

यानंतर श्रीमहाराजांचे नेतृत्वाखाली श्रीक्षेत्र नृसिंहवाडी येथील श्रीदत्तघाटावर सभोवती एक विशाल मंडप करण्याकरिता एक समिती स्थापन झाली व तेही कार्य सुरू झाले.

सांप्रत श्रीमहाराजांचे स्मारक म्हणून 'श्रीवामन निवास' या नावाने एक वास्तू विकत घेण्याचे ठरले असून त्या कार्याकरिता श्रीगुरुवामनसेवामंडळ म्हणून एक मंडळ स्थापन झालेआहे. पूर्वीची रौद्रीशांती समिती विसर्जित झाली असल्याने प्रायः त्या समितीतील मंडळींचेच हे मंडळ आहे. येथे येणारे साधक, तपस्वी, यती या सर्वांना उतरण्याकरिता म्हणून या नवीन वास्तूचा उपयोग व्हावा व हे कार्य आपण स्थापलेल्या श्रीवासुदेवनिवासरूप गुरुस्मारकालाही उपयुक्त व्हावे या उद्देशाने श्रीगुळवणीमहाराजांनी त्यांना अर्पण केलेले रौद्रीशांतीसमितीचे अवशिष्ट सर्व द्रव्य श्रीगुरुवामन सेवामंडळाकडे देऊन आशीर्वाद दिला. यामुळे उत्साहाने हे कार्य मंडळाने सुरू केले आहे. या कार्याकरिता एकंदर एकलक्ष रुपयाची आवश्यकता असून अर्धी रक्कम जमा झाली आहे. एकवर्षाचे अवधीत सर्व रक्कम भरावयाची आहे.

तरी श्रीमहाराजांचे स्मारक म्हणून घेतल्याजाणाऱ्या या प्रासादकार्याकरिता सत्कार्यप्रेमी सर्व साधक वर्गाने लक्ष ठेऊन हस्ते परहस्ते हे कार्य पूर्ण करण्याचे श्रेय संपादन करावे ही प्रार्थना.

आपले

श्रीवामननिवास सेवामंडळ

पत्रव्यवहाराचा पत्ता
**श्रीवामननिवास**
द्वारा भु. ब. भालेराव
श्रीवासुदेवनिवास, कर्वे पुणे ४.

# आश्रमवृत्त

**नवरात्रोत्सव :**— दि. २०–९–१९७१ ते २९–९–१९७१ पर्यंत नवरात्रोत्सव दरवर्षीप्रमाणे उत्तम रीतीने साजरा झाला. सप्तशतीचा पाठ व नित्य ब्राह्मण सुवासिनी भोजन या उत्सवात चालू होते. श्रीगुरुमहाराजांची कुलदेवता तुळजा भवानी आहे. ती रामवरदायिनी आहे. श्रीगुरुमहाराजांचा आश्रम आपल्याही परिसरात असावा ही तिची इच्छा. या दृष्टीने श्री. मु. मकर, श्री. तुडवळकर श्री. मशाळकर व श्री. गोविंदशेठ वियाणी ही सर्व त्या परिसरातील कार्यकर्ती मंडळी

त्यादृष्टीने अत्यंत प्रयत्नशील आहेत. तेथील संकल्पित आश्रमाची जागा ताब्यात आली असून लवकरच बांधकाम सुरू होणार आहे. सर्व मंडळींना असा विश्वास आहे की तुळजामातोश्री आपल्या प्रेममय दृष्टीने सर्व पूर्तता त्वरित करतील. सर्व भक्त मंडळींना प्रेरणा देऊन त्यांच्याकडून हे कार्य पूर्ण करून घेतील असा सर्व कार्यकर्त्यांनाही मनात विश्वास वाटत आहे. तरी सर्वांनी या कार्याला मदत करावी अशी तेथील कार्यकर्त्यांची प्रार्थना आहे.

## श्रीक्षेत्र नरसोबावाडीची यात्रा

प्रतिवर्षी श्रीगुरुमहाराज गुरुद्वादशीकरिता अश्विन महिन्यात वाडीला जातात. गुरुद्वादशी म्हणजे श्रीपादश्रीवल्लभ यांचा निजानंदी गमन करण्याचा दिवस हा उत्सव वाडीला श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांनी स्वतः सुरू केला. त्यामुळे या उत्सवाला अगदी अपूर्व महत्त्व प्राप्त झालेले आहे. या उत्सवाच्या निमित्ताने वाडीला १०–१० हजार ब्राह्मण भोजन होत असे. या उत्सवाचा प्रसाद म्हणजे देवदुर्लभ गोष्ट होय. एके वर्षी असेच उत्सवातील ब्राह्मण भोजन चालले असताना प. प. श्रीटेंबेस्वामीमहाराज म्हणाले की " हा प्रसाद मिळावा अशी देवही इच्छा करतात " इतका या उत्सवाचा व वाडीक्षेत्राचा महिमा आहे.

श्रीगुरुमहाराज १९०७ सालापासून या उत्सवाला जातात. फक्त एकदाच त्यांचा हा उत्सव चुकला. इ. स. १९२३ साली श्रीगुरुमहाराज हुशंगाबाद येथे गेले होते. त्यावेळी त्यांची व प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांची भेट होऊन श्रीगुरुमहाराजांना दीक्षा मिळाली. यामुळे गुरुद्वादशी चुकली. पण प्रसाद चुकला नाही. " म्हणौनी बहुत पुण्य तुवां। केले तेणे धनंजया। आजी शास्त्रराजा इया। जालासि विषो ।। असे श्रीकृष्णानी अर्जुनाला म्हटले त्याचा अर्थ असा आहे की शास्त्रराज शक्तिपातयोगाची प्राप्ती अर्जुनाला फार पुण्याईने झाली. अशी पुण्याई असल्याशिवाय दीक्षा मिळत नाही व शक्तिपातयोग ही काय वस्तू आहे तेही कळत नाही. श्रीगुरुदेवांचा गुरुद्वादशीचा भोजन प्रसाद चुकला तरी प. प श्रीलोकनाथ-तीर्थस्वामीमहाराज यांच्याकडून दीक्षा प्रसाद मिळाला. " देवी दीक्षा विहीनस्य न सिद्धिर्न च सद्‌गतिः। तस्मात् सर्वप्रयत्नेन गुरुणा दीक्षितो भवेत् ।। असे पार्वतीला श्रीमहेश्वरांनी आर्जवून सांगितले आहे. श्रीगुरुदेवांनी हा दीक्षा प्रसाद स्वतः तर ग्रहण केलाच पण गुर्वाज्ञेने हजारो लोकांना या प्रसादाचा लाभ करून दिला.

## श्रीमंत सरकार निर्मलाराजे भोसले यांची भेट

श्रीगुरुदेव आश्विन वद्य ५ शके १८९३, ९–१०–१९७२ रोजी सकाळी ९ वाजून १५ मिनिटांनी श्रीभाऊसाहेब शिंगणे यांच्या मोटारीने श्रीक्षेत्र नरसोबा-वाडीस निघाले. गाडीत पंडित दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर व श्रीकेशवराव हे होते. वाटेत वे. शा. स. श्री प्रभाकरशास्त्री कोडणीकर यांच्याकडे श्रीगुरुदेवांचा मुक्काम झाला. तेथे त्यांनी नैवेद्य व वैश्वदेव झाल्यावर भोजन केले. त्या दिवशी दुपारी

२ वाजता श्रीमत् शंकराचार्य श्रीजेरेस्वामीमहाराज यांचे दर्शन घेऊन श्रीगुरुमहाराज आधीच ठरल्याप्रमाणे श्रीमंत सरकार निर्मलाराजे भोसले यांच्या भेटीस गेले. बाई अत्यंत अथित्यशील, शांत व सौजन्यपूर्ण. त्या श्रीराजे शिवछत्रपती महाराजांच्या सोळाव्या सूनबाई. मोठचा खानदानी पद्धतीने आतील दरवाजापाशी स्वत: उभ्या राहून कारभाऱ्यांना पुढे पाठवून त्यांनी अत्यंत अगत्याने श्रीगुरुदेवांचे भावपूर्ण स्वागत केले. आत गेल्यावर श्रीगुरुदेवांना एका प्रशस्त व भव्य कोचावर बसवून बाईंनी खानदानी पद्धतीने रीतीरिवाजाप्रमाणे वाकून नमस्कार केला व अत्यंत अदवीने त्या जमिनीवर बसल्या.

हे दृश्य मोठे विलोभनीय होते. देवाब्राह्मणासमोर छत्रपतींची सून उच्चासनावर बसली नाही. "गोब्राह्मणप्रतिपालक" बिरुदावली ज्यांनी अभिमानाने धारण केल्याने ज्यांची कीर्ती यावचंद्रदिवाकरौ गजंत राहणार आहे. त्या किर्तीत भर घालणारी ही गोष्ट असल्याने पाहणाऱ्यांचे व श्रीगुरुदेवांचे मन संतुष्ट झाले. श्रीगुरुदेवांच्या डोळचातून कृपामृताचा वर्षाव होत आहे असे वाटत होते. छत्रपती राजे शिवाजी महाराज देवब्राह्मणांच्या आशीर्वादाचे भोक्ते व भुकेले होते. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांकडून यासाठीच त्यांनी अनुग्रह घेतला होता.

भेट संपली. श्रीमंत सरकार निर्मलाराजे यांनी नमस्कार केला. इतरांनीही नमस्कार केले. जाता जाता बाई म्हणाल्या "महाराज! आता बाकी काही वैभव राहिले नाही. मात्र श्रीशिवछत्रपतींची पुण्याई पाठीशी आहे म्हणून हे दिवस दिसत आहेत." श्रीगुरुमहाराज वाडचाच्या दर्शनी भव्य दरवाजाच्या पायऱ्या उतरून खाली आले. बाई तेथूनच निरीक्षण करीत थांबल्या. श्रीगुरुदेव मोटारीत बसले बरोबर संध्याकाळी साडेसहावाजता वाडीला पोहोचले.

श्रीगुरुदेव दि. २६–१०–१९७१ पर्यंत वाडीला राहिले. या मुक्कामात त्यांना गार पाण्याचे रोजचे स्नान सोसले हे विशेष होय. अश्विनाचे दिवस म्हणजे थंडीची सुरवात. परंतु थंडीचा विचार स्नानापुढे अगदी गौण ठरे. सकाळी देवाची काकड आरतीकरिता व स्नान करून देवाला पाणी घालण्या..रिता त्वरेने, लगबगीने, अधिरतेने व उत्साहाने श्रीगुरुमहाराजांना जाताना पाहिले की पाहाणारे व बरोबरीने चालणारे अगदी अवाक् होऊन जातात. अत्यंत दुर्लभ दृश्य कितीतरी वेळा डोळचात साठविले तरी पाहाणारांचे कसे समाधान होणार? कविवर्य मोरोपंतांप्रमाणे विचारावेसे वाटते की, "उठता बहु त्वरेने कोठे जाता असे तुम्हा देवो? याचे उत्तर श्रीसमर्थांनी फार सुंदर दिले आहे. "देवाच्या सख्यत्वासाठी.' पण हे कार्य तर केव्हाच झाले आहे. आता लगबग व्यर्थ तर नाही? निश्चित नाही. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात "मार्गाधारे वर्तावे। विश्व हे मोहरे लावावे। अलौकिक नोहावे। लोकांप्रति॥" असा लोकसंग्रह करणाचा हेतू असला पाहिजे. श्रीगुरुमहाराजांचे लोकसंग्रहाचे ... दृष्टोत्पत्तीस येत.

**श्रीबाबा महाराज आर्वीकर यांची भेट** :- दि. २६-१०-१९७१ रोजी श्रीगुरुदेवांनी नेहमीप्रमाणे आन्हिक आटोपले. जेवण झाले की वाडीहून निघून मिरजेला डॉ. केशवराव प्राणी यांच्याकडे प्रतिवर्षीप्रमाणे मुक्कामाला जावयाचे ठरले होते. कोणताही कार्यक्रम बाकी राहिला नव्हता, आधल्या दिवशीच मातुश्री उमाबाईंचे श्राद्ध आटोपले होते. वाडीच्या मुक्कामातील हा शेवटचा कार्यक्रम. त्या दिवशी माधुकरीही वाढली जाते.

श्रीगुरुमहाराज जेवण्यास निघणार इतक्यात श्रीबाबामहाराज आर्वीकर यांच्याकडून आलेले दोन शिष्य दत्त म्हणून पुढे उभे राहिले. "बाबा आजारी आहेत. आपले दर्शन मृत्यूपूर्वी व्हावे अशी त्यांची तीव्र इच्छा आहे. आपण नाही म्हणू नये. कसेही करून यावे. नेण्याआणण्याची सर्व सोय उत्तम करतो" अशी दोघांनी परोपरीने विनवणी केली. श्री गुरुमहाराज म्हणाले, "माझी प्रकृती इतक दूरचा प्रवास करण्याइतकी उत्तम नाही. मला ते सोसणार नाही. आता या वेळी नको. पुढे पाहू ! परंतु त्यांचा आग्रह चालूच होता. श्री. केशवराव यांनीही आपण फार आग्रह करू नये म्हणून परोपरीने त्यांना सांगितले. पण श्री गुरुदेवांना घेऊन जावयाचेच अशा कृतनिश्चयाने ते आले होते. ते म्हणाले महाराज "आपण काही झाले तरी यावेळी नाही म्हणू नये. बाबांना कॅन्सर झाल्याने ते फारच अत्यवस्थ आहेत. त्यांनी आम्हांला पाटीवर लिहून दाखविले की, श्रीगुळवणी महाराजांचे दर्शन स्वप्नात एक दोन वेळा झाले आहे. प्रत्यक्ष दर्शनाची फार तीव्र इच्छा आहे. माझा निरोप सांगून त्यांना घेऊन यावे.

श्री गुरुमहाराज एक क्षणभर स्वस्थ उभे राहिले आणि म्हणाले, "येतो. जरूर येतो." संध्याकाळीच निघू. तुम्ही मिरजेला डॉ. प्राणी यांच्याकडे गाडी घेऊन या म्हणजे रात्रीच निघू. श्री अळाटकर व श्री दळवी या दोघांना ही योजना पसंत पडली. ते मोटार आणण्यासाठी निघून गेले. श्री गुरुदेव जेवण करून देवाचे दर्शन घेऊन मिरजेला जाण्यास निघाले.

वाडीला जावयाचे म्हणजे श्रीगुरुदेवांच्या आनंदाला सीमा नसते. हा आनंद वर दिसणार नाही किंवा उसळणार नाही. परंतु तो पाहाणाऱ्यास जाणवेल. कृतीतून उमटेल. एखाद्या शब्दातून मनाला चाटून जाईल. मध्येच भेटणाऱ्या एखाद्या प्रेमळ भक्ताला सांगितल्या जाणाऱ्या आठवणीतून तो नटलेला दिसेल. रात्रीच्या वेळी आरती झाल्यावर पलगावर पडल्या पडल्या प्रा. चव्हाण यांच्या बरोबर चाललेल्या चर्चेतून या आनंदाची एखादी विजेची झलकही नवागतला चाटून गेल्याशिवाय राहाणार नाही.

आणि वाडीहून परत येताना खरे सांगावयाचे म्हणजे श्रीसंत तुकाराम महाराजांनी आपली व्यथा जशी अभंगातून प्रकट केली आहे तशी स्थिती. अगदी तशी. पुन्हा तेच. वरवर नाही दिसणार ! अगदी आत कुठेतरी ती खोल दडी

मारून असणार. क्वचित पाहणाऱ्याला डोळ्याच्या पापण्यांनी जाणीव दिली तर दिसणार. नाही तर ते कसे शक्य आहे? फार कठीण आहे. मग अभंगाच्या आधाराने जाणायचे की असे असेल. "कन्या सासुऱ्यासी जाये। मागे परतोनी पाहे॥ १॥ तैसे जाले माझ्या जीवा। कधी भेटशील केशवा॥ २॥ चुकलिया माये। बाळ हुरू हुरू पाहे॥ ३॥ जीवना वेगळी मासोळी। तैसा तुका तळमळी॥ ४॥ वाडीहून निघताना प्रत्येकवेळी असेच अविष्कारतरंग श्रीगुरुदेवांच्या हृदयपुष्करणीवर हेलकावत असणार यात शंका नाही. "लोकोत्तरणां चेतांसि कोतु विज्ञातु महंसी। हेच खरे. किती पापुद्रे उलगडणार ?

श्रीगुरुमहाराज मिरजेला सायंकाळी सहा वाजता आले. थोडी विश्रांती झाली. सर्वांची चौकशी झाली. प्रसाद दिला. कोल्हापुराहून गाडी येण्याची वाट पाहात श्रीगुरुमहाराज स्वस्थ पडून होते. आठ वाजले. गाडी आली नाही. मग संध्या इत्यादी उरकून पुन्हा जाण्याच्या तयारीत राहिले. पण गाडीच आली नाही. रात्री आकरा वाजता श्रीदळवी गाडी घेऊन आले. परंतु रात्रीचा प्रवास नको म्हणून दुसऱ्या दिवशी सकाळी निघावयाचे ठरले.

दुसऱ्या दिवशी पहाटे ५ वाजता श्रीगुरुदेवमहाराजांनी सोलापुरी प्रयाण केले. गाडीत श्रीदळवी, श्रीअलाटकर व श्रीकेशवराव होते. रस्ता पंढरपुराहून होता. परंतु जाताना दर्शन न घेता येताना दर्शन घ्यावयाचे असा बेत ठरवून सर्व जण त्वरित निघाले. गाडीचे सौकर्य व रस्त्याची सुविधा यामुळे प्रवास सुखकर झाला.-वाटेत जाताना चंद्रभागेचे दर्शन झाले. दुरून देवळाचे कळस दिसत होते. त्यांना चालत्या गाडीतूनच नमस्कार करून सकाळी १०॥ वाजता श्रीगुरुमहाराज सोलापुरी पोहोचले.

गाडी प्रथम श्रीबाबामहाराज यांच्या घरी घेण्यात आली. त्यावेळी त्यांचा मुक्काम सिद्धेश्वर पेठेत एका घरात माडीवर होता. श्रीगुरुमहाज येणार अशा तयारीत सर्वजण वाट पाहात होते. श्रीगुरुमहाराजांनी श्रीबाबांच्या खोलीत प्रवेश केल्यावर तेथील लोकांनी बसण्याकरिता खुर्ची पुढे केली. परंतु खुर्चीवर न बसता श्रीगुरुमहाराज एकदम श्रीबाबांच्या पलंगावर जाऊन बसले. श्रीबाबांचा हातात हात घेत श्रीमहाराज म्हणाले "आपण निरोप दिल्याप्रमाणे मुद्दाम भेटीस आलो" या एका वाक्याने श्रीबाबांना खूप समाधान वाटले. कॅन्सर ची जखम मूलतः तोंडात झालेली असली तरी तिने दोन्ही दाढा भेदून बाहेर प्रवेश केल्यामुळे सर्व मुखमंडल कापडाने वेष्टून टाकले होते. श्रीबाबांचा भव्य देह अगदी अस्थिपंजर झाला होता. पण जखमेच्या वेदना त्यांनी गिळून टाकल्या होत्या. बाबा शांत होते. त्यांना श्रीगुरुमहाराजांशी बोलता येणे शक्य होत असल्याने काही लिहून दाखवावयाचे असेल अशा कल्पनेने त्यांच्या शिष्यांनी पाटीपेन्सिल पुढे धरली. परंतु बाबांनी काही लिहावयाचे नाही अशी मानेने खूण केली. दर्शनानेच [illegible] झाले होते.

आपली इच्छा पूर्ण झाल्याने भेटीचे एक अपूर्व समाधान त्यांना वाटले. दुपारी चार वाजता परत येतो असे सांगून श्रीगुरुमहाराज व श्रीकेशवराव श्रीबापूसाहेब कुवडे यांच्याकडे गेले. तेथे आन्हिक जेवण करून विश्रांती घेऊन श्रीगुरुमहाराजांनी दुपारी अर्धातास पुन्हा श्रीबाबांची भेट घेतली. सर्व विचारपूस केली. श्रीबाबांना अशा स्थितीत माचणूरला हलविणे चांगले असा प्रेमळ सल्लाही दिला. तेथील मंडळींनी पुढे त्यांना माचणूरला हलविले तेथेच त्यांचे देहावसन झाले.

दि. २८–९–१९७१ रोजी पहाटे ५–२० ला श्रीगुरुमहाराज सोलापुरहून निघून वाटेत पंढरपुरला श्रीपांडुरंगाचे व सौ. रूक्मिणी मातुश्रींचे दर्शन घेऊन मिरजेला परत आले.

---

"पंथराज" पुणे या नावाच्या त्रैमासिमाचा मालकी व अन्य तपशील या संबधीचे फेब्रुवारीच्या शेवटच्या दिवसानंतरच्या पहिल्या अंकात प्रतिवर्षी प्रसिद्ध करण्याचे निवेदन.

**तक्ता–४**

**( नियम ८ पहा )**

| | | |
|---|---|---|
| १. प्रकाशनाचे स्थळ | : | श्रीवासुदेवनिवास ६३/१७ एरंडवन, कर्वे पथ, पुणे–४. |
| २. प्रकाशनाचा काळ | : | त्रैमासिक |
| ३. मुद्रकाचे नाव | : | रामचंद्र शंकर नेलेकर. "श्रीनाथ प्रिंटिंग प्रेस" ३३५, शनिवार पेठ पुणे–३० |
| ४. प्रकाशकाचे नाव | : | केशव रामचंद्र जोशी |
| भारताचा नागरिक आहे काय ? | : | होय |
| पत्ता | : | श्रीवासुदेवनिवास ६३।१७ एरंडवन कर्वे पथ पुणे–४ |
| ५. संपादकाचे नाव | : | केशव रामचंद्र जोशी |
| भारताचा नागरिक आहे काय ? | : | होय |
| पत्ता | : | श्रीवासुदेवनिवास ६३।१७ एरंडवणा कर्वे पथ, पुणे–४ |
| ६. भरणा झालेल्या भांडवलाच्या एक टक्क्यापेक्षा अधिक भाग ४–२–१९७२ रोजी धारण करणाऱ्या वृत्तपत्राच्या भागधारकांची, भागोदारांची किंवा व्यक्तिगत मालकांची नावे व पत्ते | : | नाही |

मी केशव रामचंद्र जोशी जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे व विश्वानुसार खरा आहे.

दि. ४–३–१९७२. सही–केशव रामचंद्र जोशी (प्रकाशक)

## मी गुरूपदाची रहिवासी

गुरू चरणाची दासी मी. गुरूचरणाची रहिवासी ॥ धृ० ॥
सद्गुरू माझा सखा सोयरा । सद्गुरू एकचि जगी आसरा ।
जन्मोजन्मीची आस एक ही । धरिली मनी मानसी ॥ १ ॥

गुरूवचने ही श्रवण करावी । प्रेमानंदे भजने गावी ।
अंतरी स्मरणी सतत धरावी । आंस मनी मानसी ॥ २ ॥

भक्ति भावे पद हे चुरता । गळूनी जाईल देह अनंता ।
पुजा अर्चा करीता करीता । रूप दिसे मानसी ॥ ३ ॥

कर संपुष्टे जोडूनी सदा । लीन असावे सदा सर्वदा ।
दास्य भक्तीही श्रेष्ठ सर्वदा । सतत धरीली मानसी ॥ ४ ॥

शरणांगतास गुरू संभाळी । पाठी पुढती माय माऊली ।
सख्य भक्तिही मनी आठवी । दृढ धरीली मानसी ॥ ५ ॥

परिस लागता लोखंडासी । सुवर्ण झळके ते जोराशी ।
आत्मज्ञाने गुरू भक्तासी । दाविना स्वरूपासी ॥ ६ ॥

कवयित्री:—कुसुमताई जोशी, (डोंबिवली)

# —: अनुक्रमणिका :—






प्रकाशक– श्रीवासुदेव प्रकाशन श्रीवासुदेव निवास, एरंडवन,
कर्वे पथ, पुणे ४.

मुद्रक– रामचंद्र शंकर नलेकर,
श्रीनाथ प्रिंटिंग प्रेस,
३३५ शनवार, पुणे ३०.

## — नियमावली —

**विशेष सूचना – ज्या ग्राहकांनी शके १८९४ अर्थात १९७२ साठी वर्गणी पाठविलेली नसेल त्यांनी ती कृपया त्वरीत पाठवून द्यावी.**

१) पंथराज–चैत्र, आषाढ, आश्विन व पौष शु॥ प्रतिपदेस प्रकाशित होईल.

२) सभासदत्व :– प्रारंभ चैत्रापासून पूर्ण वर्षासाठी होईल. त्यानंतर होणाऱ्या सभासदांना त्यावर्षातील मागील अंक शिल्लक असल्यास मिळतील. पोस्टलऑर्डर अगर चेकने वर्गणी पाठवू नये.

३) वार्षिक वर्गणी पांच रुपये (रु. ५/–) राहील. आपण वर्गणी पाठविल्यानंतर प्रसिद्ध होणाऱ्या अंकासोबत वर्गणीची पावती पाठविण्यात येईल. स्वतंत्र पोष्टाने पावती पाठविली जाणार नाही. किरकोळ अंकाची किंमत दोन रुपये (रु. २-००) राहील.

४) परदेशातील सदस्यांना वर्गणी व्यतिरिक्त टपालखर्च अधिक भरावा लागेल.

५) पत्रोत्तरासाठी जोडकार्ड वा टपालाचा खर्च पाठवावा ही विनंती. सदस्यांनी पत्रव्यवहार करताना आपला सदस्य क्रमांक अवश्यमेव लिहावा.

६) आपल्या येणाऱ्या प्रत्येक पत्रावर आपला पूर्ण पत्ता लिहावा.

७) जाहिराती स्वीकारल्या जाणार नाहीत.

८) पंथराजाच्या ध्येय धोरणाशी सुसंगत लेख पाठवावेत.

९) लेखाची मूळ प्रत आपणाकडे ठेवावी. लेख कागदाच्या एका बाजूवर सुवाच्य व मोठ्या अक्षरात लिहून पाठवावेत. पंथराजाकडे पाठवावयाचे लेखन ( लेख, कविता इ. ) अन्यत्र प्रकाशनासाठी पाठविलेले नसावे.

१०) लेखामध्ये आवश्यक ते परिवर्तन किवा परिवर्धन करणे संपादकांच्या विचाराधीन राहील. अंकातील साहित्य प्रकाशित करण्यासंबंधीचा निर्णय संपादकच घेऊ शकतील.

११) अस्वीकृत लेख परत पाठविले जाणार नाहीत आणि त्यासंबंधी पत्रव्यवहार होणार नाही.

पत्रव्यवहाराचा व शुल्कपाठविण्याचा पत्ता :–

व्यवस्थापक, पंथराज

श्री वासुदेव निवास, [illegible]

रजिस्टर नं. २०७६=/७१

# दैवीशक्तीचे संक्रमण

**बंदऊँ गुरू पद कंज, कृपासिंधु नररूप हरि। महामोहतमपुंज, जासु बचन रबि कर निकर ।। श्रीगुरू पद नख मनि गन जोती। सुमिरत दिव्य दृष्टि हियँ होती ।। दलन मोह तम सो सप्रकासू। बडे भाग उर आवई जासू ।। उधरहिं बिमल बिलोचन ही के। मिटहिं दोष दुख भव रजनी कें ।। सूझहिं रामचरित मनि मानिक। गुपुत प्रगट जहँ जो जेहि खनिक ।। जथा सुअंजन अंजी दृग। साधक सिद्ध सुजान ।। कौतुक देखहिं सैल बन। भूतल भूरि निधान ।। गुरूपद रज मृदु मंजुल अंजन। नयन अमियदृग दोषबिभंजन। तेहिं करि बिमल बिबेक बिलोचन। बरनउँ रामचरित भवमोचन।**

मी गुरुमहाराजांच्या चरणकमलाला वंदन करतो. ते कृपेचे सागर व नररूपामध्ये श्रीहरीच आहेत. ज्याप्रमाणे सूर्यकिरणांचासमूह अंधकाराचा नाश करतो त्याप्रमाणे शक्तिपातयुक्त असे ज्ञानांजन-शलाकारूप श्रीगुरूचे वचन महामोहरूपी दाट अंधकार दूर करते. श्री गुरुमहाराजांच्या चरणांच्या नखांचे तेज दिव्य मण्याच्या प्रकाशासारखे आहे. त्यांच्या चरणाचे स्मरण करताच हृदयामध्ये दिव्य दृष्टी उत्पन्न होते. तो दिव्य प्रकाश अज्ञानरूपी अंधकार दूर करणारा असतो. ज्याच्या हृदयात शक्तिसंक्रमण होऊन असा प्रकाश उत्पन्न होतो त्याचे भाग्य अत्यंत मोठे असते. तो प्रकाश हृदयात आला की माणसाचे निर्मल नेत्र उघडतात. संसाररूपी रात्रीचे दोष दुःख इत्यादि सर्व नाहीसे होते. एवढेच नव्हे तर ज्या त्या खाणीत गुप्त किंवा प्रकट असलेली अशी मणी-माणके दृष्टीस पडतात. सिद्धांजन डोळ्यात घालून साधक, सिद्ध व सुजाण लोक पर्वतात, अरण्यात किंवा पृथ्वीवर कौतुकाने पुष्कळ चांगल्या गोष्टींचा अनुभव घेतात. श्रीगुरुमहाजांच्या चरणाची धूळ अत्यंत कोमल व सुंदर अशा नयनामृत अंजनासारखी आहे. त्या अंजनाने वि[illegible] त्रांना शुद्ध करून मी संसाररूपी बंधन दूर करणारे श्रीराम च[illegible]



( श्रीगोस्वामी तुलसीदासजी